स्वप्नेऽप्याचार्यमंत्रः .......

रज्जुवर व सर्पावर आपली सत्य बुद्धि आहे म्हणून आपल्याला प्रातिभासिक सत्ता भासते. जागृति आपण सत्य मानतो म्हणून स्वप्न मिथ्या मानतो. वास्तविक ब्रह्मदृष्टीने दोन्ही खोटेंच. अविद्या ही त्रिगुणात्मक आहे. हीच सांख्याची प्रकृति होय. ही अविद्या यावज्ज्ञान म्हणजे मोक्ष झाला नाही तोपर्यंत अनंत आहे. सांख्याने अविद्येची निवृत्ति होते. हें सांख्य भगवान कपिल मुनींनी सांगितलें व ते ईश्वरी अवतार होते हें मागे तुला सांगितलें. अवतार दोन प्रकारचे. एक अंशावतार व दुसरा कलावतार. अवतारी पुरुषांचें ज्ञान निर्भ्रम असतें. जीवाच्या ज्ञानांत जसे भ्रम, प्रमाद, विप्रलिप्सादिक दोष असतात, तसे याच्या ज्ञानांत संभवत नाहीत. बुद्धावतारांत विप्रलिप्सा दिसते पण तो अवतार दैत्यांना मोह उत्पन्न करण्याकरिताच होता; म्हणून त्यांत विप्रलिप्सा आहे. पण कपिलाचा अवतार दयेसाठी असल्यामुळे त्यांच्या ज्ञानांत विप्रलिप्सा वगैरे नाही. कपिल दोन झाले. एक ब्रह्मपुत्र व दुसरे देवहूती पुत्र. हे दोघेहि विष्णुचे अवतार होते. जीवहि योग, तप, ज्ञान यांच्या योगाने पुढल्या कल्पांत ब्रह्मदेव झाला असतां. त्याचें ज्ञान निर्भ्रम असतें. इत्यादि निरूपण सिंहावलोकन न्यायाने तुला पुन्हा सांगितलें. आता पहिल्या कारिकेंत ग्रंथकार सांगतात,

दुःखत्रयाभिघाताज्जिज्ञासा तदभि घातके हेतौ ।
दृष्टेसापार्था चेन्नैकान्ता त्यन्ततोऽभावात् ॥१॥

दुःखत्रयाभिघात म्हणजे अध्यात्मिकादि दुःखाची आत्यंतिक निवृत्ति सांख्याशिवाय होत नाही. कारण मंत्रौषधादि उपचारांनी जरी तें एकदा निवृत्त झालेंत तरी पुन्हा उत्पन्न होत असल्यामुळे त्यांचा आत्यंतिक नाश न होतां ध्वंस होतो. म्हणून दुःखांच्या आत्यंतिक नाशांचा उपाय म्हटला म्हणजे सांख्य हाच एक आहे. भाष्यकार उपोद्घातांतहि हेंच सांगतात: "अंधतमसि मज्जज्जगदालोक्य" म्हणजे अज्ञानांधकारांत बुडत असलेल्या जगाला पाहून करुणेने युक्त झाल्यामुळे ज्याला जिज्ञासा उत्पन्न झाली आहे अशा आसुरी गोत्री ब्राह्मणाला भगवान कपिलांनी हें पंचविंशति

तत्त्वाचें ज्ञान म्हणजे सांख्य सांगितलें. वर सांगितलेल्या आसुरी ब्राह्मणाला जी जिज्ञासा उत्पन्न झाली म्हणून म्हटलें आहे ती दोन प्रकाराने होत असते. एक प्रत्यक्ष प्रमाणाने व दुसरी आगम किंवा शाब्द प्रमाणाने यांत दुःख निवृत्तीची जिज्ञासा ही प्रत्यक्ष प्रमाणाने उत्पन्न होते म्हणजे सांसारिक दुःखापासून आपली सुटका व्हावी अशा इच्छेने संसार तुच्छ वाटतो, त्याला प्रत्यक्ष जिज्ञासा होते. आता शाब्द जिज्ञासा जी आहे ती श्रुति वगैरे ऐकून उत्पन्न असल्यामुळे तिला शाद्धिक जिज्ञासा म्हणतात. कारण ब्रह्म हें प्रत्यक्ष गोचर नसल्यामुळे तें आहे असें कळण्याला श्रुति वगैरे शाद्ध प्रमाण पाहिजें, म्हणजे ब्रह्म साक्षात्कार प्रत्यक्ष होऊन दुःख निवृत्त व्हावें अशा प्रकारची जिज्ञासा शाद्धप्रमाणांनी होते. या दोन्ही प्रकारच्या जिज्ञासा ज्याला खरोखर झालेल्या असतात तोच पुरुष मुमुक्षु होय. ज्याला पहिली जिज्ञासा झाली आहे म्हणजे नुसता संसारच मिथ्या वाटला व ब्रह्म माहित नसलें तर तो बौद्धासारखा होतो. म्हणून शाद्धिक जिज्ञासा झाली पाहिजे. बरें ज्याला शाद्धिक जिज्ञासा झाली आहे म्हणजे श्रुति वाक्याने ब्रह्म आहे असें कळलें, पण प्रात्यक्षिक जिज्ञासा झाली नाही म्हणजे संसार मिथ्या वाटला नाही, तर शाद्धिक जिज्ञासेपासून त्रास होतो. कारण याच्या योगाने तें ब्रह्म आपणास कळून संसार चांगला व्हावा अशी इच्छा उत्पन्न होते. ईश्वरभक्ति व्हावी अशी इच्छा उत्पन्न होत नाही. नुसत्या शाद्धिक ज्ञानांतच ते आनंद मानत असतात. म्हणून प्रथम प्रत्यक्षजन्य जिज्ञासा व्हावी लागते. आता ही प्रत्यक्षजन्य जिज्ञासा बहुतकरून सर्वांना होते; परंतु शाद्धिक जिज्ञासा मात्र गुरुवाचून होत नाही. तर याप्रमाणे तो आसुरी ब्राह्मण जिज्ञासमान होता. त्याला कपिल भगवान हें पंचविंशति तत्त्वांचें ज्ञान सांगतें झाले.

**शिष्यः**– महाराज! या आसुरी ब्राह्मणाला संसारांतील दुःख पाहून प्रात्यक्षिक जिज्ञासा झाली होती, परंतु ज्ञान तर तेव्हा प्रकट नव्हतें. मग त्याला शाद्धिक जिज्ञासा कशी झाली?

**गुरुः**—ज्ञान प्रगट नव्हतें असें नाही. तें निरनिराळ्या ऋषींच्या द्वाराने प्रगट झालेंच होतें. परंतु तें जरी निरनिराळ्या ऋषींनी काढलें

होतें तरी तें समजावून मात्र कपिलांनीच दिलें. त्या ब्राह्मणाला प्रथम प्रात्यक्षिक जिज्ञासा झाली होती पण तेवढ्यानेच तो तृप्त झाला नाही. तर त्याला शाद्बिक जिज्ञासाहि झाली. कारण कपिलांनी त्याला पंचविंशति तत्वात्मक ज्ञान सांगितलें. यावरून त्याला ती जिज्ञासा झाली म्हणून दोन्ही प्रकारच्या जिज्ञासा असलेला पुरुष या शास्त्रांत अधिकारी आहे. हें सांख्य ज्याला आहे तो कोणत्याहि आश्रमांत असो, त्याचा दु:खक्षय होऊन तो मुक्त होतो. त्याला प्रमाण

श्लोक:- पंचविंशतितत्त्वज्ञो यत्रतत्राश्रमे वसेत् ।।
जटी मुंडी शिखीवापि मुच्यते नात्र संशयः ।।१।।

या सांख्यांत ८ प्रकृति, १६ विकार व एक पुरुष अशीं २५ तत्वें मानलीं आहेत. परंतु थांत ईश्वर मानला नाही.

**शिष्यः**– याचें कारण काय? म्हणूनच लोक यांना नास्तिक मानीत असतील.

**गुरुः**–नाहींत. लोक सांख्यांना जरी नास्तिक मानतात तरी वास्तविक ते नास्तिक नाहींत. त्यांनी ईश्वर जरी खोडला आहे तरी तो नैय्यायिकांचा ईश्वर खोडला आहे. त्याची कल्पना अशी आहे ते नैय्यायिकाला विचारतात, तुम्ही बद्धाला ईश्वर मानतां किंवा मुक्ताला मानता? बद्धाला मानित असले तर ते संभवत नाही. कारण ईश्वराला कधीच बंधन नाही. मुक्ताला ईश्वर मानित असाल तर तो पूर्वी बद्ध असला पाहिजे, म्हणून ज्याला कधीहि बंधन नाही असा पुरुष सांख्यानी मानला आहे. ईश्वर वगैरे नाही हा त्यांचा वाद दुर्जनाच्या खंडणाकरिता आहे. ईश्वराचेंहि ऐश्वर्य पाहून जीवाला मोह होऊं नये हा त्याचा उद्देश आहे. वैराग्यशील पुरुषाला ईश्वराचें ऐश्वर्य व्यर्थ वाटतें. कारण ईश्वराचें ऐश्वर्य जरी असलें तथापि तो सत्वगुण असल्यामुळे वैराग्याला बाधक आहे. म्हणून तें ऐश्वर्य वैराग्यशील पुरुषाला व्यर्थ वाटतें. सुंदरपणा वगैरे डोळ्याचा विषय आहे. गोपालकृष्णाच्या सौंदर्याला भुलून कामाने गोपिका तरल्या असतील. पण मूर्ख लोक त्याचा निराळाच अर्थ करतात. ते म्हणतात, श्रीकृष्णाने

बायका भोगल्या तर आपणहि भोगाव्या. म्हणून ईश्वराचें खंडण रास्त आहे. सद्भक्ताकरिता कांही ईश्वराचें खंडण नाही. तर जे त्यांचें ऐश्वर्य पाहून त्याची इच्छा करतात अशा मूढ लोकाकरिता सांख्यांनी ईश्वर खोडला. वैराग्यशील पुरुषांना त्याचें (ईश्वराचें) ऐश्वर्य नको असतें. "तुका म्हणे तुझी न लगे दसोडी ॥" या वचनाप्रमाणे भगवद्भक्तांची स्थिति असते. तर अशा वैराग्यशील भक्ताकरिता सांख्यांनी परमेश्वराचे खंडण केलें नाही, तर उलटे "ईशदशेश्वर सिद्धिः सिद्धाः" या सूत्रानें त्याचें मंडणच केलें आहे. सारांश, सांख्याचें तत्त्व हेंच आहे की, सर्व प्रकारच्या विषयांच्या ठायीं आपल्यास वैराग्य व्हावें, दुसरें कांहीच रुचूं नये. रुचेल तर तो बद्ध झाला.

**शिष्यः**— ईश्वराचें ऐश्वर्य ईश्वराला बंधक नाही काय ?

**गुरुः**— अरे ! तूं अगदी मूर्ख आहे. तूं जर असें मानतोस तर तुझ्याकरिता ईश्वराचें खंडणच रास्त आहे. अरे ! ब्राह्मणाचें कर्म ब्राह्मणाला कधी बंधन करतें कां ? त्याला त्याची किट् किट् वाटली तरी तो तें करीतच असतो. पण त्याच कर्मानें शूद्राला अभिमान चढतो. तसेंच राजाचें धन राजाला बंधक नाही; पण तेंच चोराला बंधक आहे. त्याप्रमाणे ईश्वराच्या ऐश्वर्याची जीवाने इच्छा केल्यास ते सत्वगुणरूप असल्यामुळे त्याला बंधक आहे, पण ईश्वराला ते मुळीच बंधक नाही. तर ईश्वराच्या ऐश्वर्याच्या ठिकाणीं वैराग्य व्हावें म्हणून "ईश्वरा सिद्धेः" या सूत्राप्रमाणे ईश्वराचें खंडणहि केलें व "ईशदशेश्वर सिद्धिः सिद्धाः" या सूत्रानें ईश्वर अशाप्रकारचा आहे हेंहि सांगून गेले.

**शिष्यः**— महाराज ! या ठिकाणीं भाष्यांत परस्पर विरोध नाही काय ?

**गुरुः**— अरे, हें अवधान नसल्यामुळे झालें असावें.

**शिष्यः**—महाराज ! सांख्यांत नैय्यायिकांचा ईश्वर खोडला आहे असें आपण वर सांगितलें, तर ईश्वराची सिद्धि कोणत्याच प्रमाणानें होऊं शकत नाही काय ?

**गुरु**.– तूं ईश्वरसिद्धि कोणत्या प्रमाणाने करतोस? प्रत्यक्ष, अनुमान, किंवा आगम यापैकी कोणत्या प्रमाणाने ईश्वरसिद्धि होते असें तुला वाटतें? प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्धि होत नाही. कारण ईश्वर दृष्टीस पडत नाही. अनुमान प्रमाणाने सिद्धि मानावी तर तेंहि घडत नाही. कारण नैय्यायिक हे "क्षित्यादिकं यद्यत्कार्यं ....." म्हणजे जो जो पदार्थ दिसतो तो तो सकर्तुक म्हणजे कर्त्याने केलेला असतो असें मानतात. यावरून कार्याला कर्ता असला पाहिजे. मग हें क्षित्यादि ब्रह्मांड कार्य असल्यामुळे यालाहि कोणीतरी कर्ता पाहिजे. आता ईश्वर जर ह्या ब्रह्मांडाचा कर्ता मानला तर तो शरीरसहित आहे किंवा शरीररहित आहे? तो शरीरसहित असेल तर त्याचेंहि शरीर कार्य असलें पाहिजें. म्हणजे त्याला माय बाप पाहिजे. येणेकरून येथे अनवस्था प्रसंग येईल. बरे तो जर शरीररहित मानला, तर हातापायाशिवाय नुसता कुंभासारखा मानावा लागेल. मग त्याच्याने कार्य कसें होणार? म्हणून अनुमान प्रमाणानेहि ईश्वराची सिद्धि होत नाही. आता राहिलें आगम म्हणजे शाद्बप्रमाण तर तेंहि संभवत नाही. कारण उपासनेकरिता आगमांत ईश्वर सांगितला आहे. म्हणजे आगमाने त्या उपासनार्थ ईश्वर कल्पित ठरविला आहे. तर या तिन्ही प्रमाणाने ईश्वराचें खंडण होतें; म्हणून याप्रमाणे ईश्वराची असिद्धि झाली.

आता ईशदशेश्वर सिद्धिः सिद्धाः यासूत्राप्रमाणे आम्ही ज्याला आत्मा म्हणतो, तो जर तुमचा (नैय्यायिकांचा) ईश्वर असेल तर तो आम्ही मानतो. वृत्तिकार म्हणतात की, आमच्या मताने ईश्वर आहे पण नैय्यायिक मानतात तसा तो ऐश्वर्यवान नाही. याप्रमाणे न मुक्त झालेल्या जीवांना ईश्वराच्या ऐश्वर्याच्या ठिकाणीं देखील वैराग्य उत्पन्न व्हावें म्हणून सांख्यांत ईश्वराचें खंडण केलें आहे.

**शिष्यः**–महाराज! येथे ईश्वराला जे आत्मा म्हटलें आहे तें वेदांताचें मत आहे. तें सांख्यांनी कसें घेतलें?

**गुरुः**–अरे, सांख्य व वेदांत यांचा समन्वयच आहे. कारण वेदांतांत जरी २६ तत्त्वें आहेत तरी त्यांत सांख्यांचेंच २५ तत्वें घेऊन सव्वीसावा

जो ईश्वर त्याचा अंतर्भाव ब्रह्मांत केला आहे. वेदांताने सर्व जगत ब्रम्ह आहे हें समजतें व सांख्यानें प्रकृतिपुरुषाचा विवेक समजतो. म्हणजे सांख्याने ब्रह्म समजावून घेऊन वेदांताने तें सर्व व्यापक आहे असें जाणावें. स्मृतिहि असेंच सांगते.

विनिश्चित्यात्मतां सांख्ये योगादध्यात्ममाचरेत् ।
साकारं तन्निराकारं वेदांतेनैव साधयेत् ।।
सांख्ये आत्म निर्धार । योगें अनुभव साक्षात्कार ।
साकार तितुकें निराकार । हे वेदांत गुह्य ।।

असो. तर याप्रमाणे पंचविंशति तत्त्वांचें ज्ञान भगवान कपिल मुनी आसुरी (ब्राह्मणाला) मुनीला सांगते झाले. या ज्ञानाने दुःखक्षय होतो.

**शिष्य**–महाराज ! कोणी म्हणतात की, हे सांख्यांतले महदादिक पदार्थ वेदांत व लोकांत म्हणजे श्रुतींत स्मृतींत सापडत नाहीत. तर हें खरें आहे काय ?

**गुरु**:–म्हणजे पर्यायाने, त्याचा अर्थ असा की, हें पंचविंशति तत्त्व जाणलें असतां त्रिविध दुःख दूर होतें. याला श्रुतिस्मृति प्रमाण नाही. परंतु हें त्याचें म्हणणें यथार्थ नाही. कारण त्यांचें खंडण करण्यास सांख्यकारहि स्मृति प्रमाण घेतात.

पंचविंशति तत्वज्ञो यत्र तत्राश्रमे वसेत् ।
जटी मुंडी शिखीवापि मुच्यते नात्र संशयः ।।

याचा अर्थ तुला मागेच सांगितला आहे. आता आर्येच्या भाष्याला आरंभ झाला. 'दुःखत्रयाभि घातात्' दुःख हें तीन प्रकारचें आहे. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक. आपल्यापासून होणारें तें आध्यात्मिक, दुसऱ्यापासून होणारें आधिभौतिक व देवापासून होणारें आधिदैविक. या त्रिविध दुःखाचें निरूपण दासबोधांत फार मजेदार केलेलें आहे. आता आध्यात्मिक दुःखाचें स्वरूप स्मृतिकार सांगतात. देहेन्द्रियमनप्राणैः · · · म्हणजे देह, इंद्रियें, मन व प्राण यापासून होणाऱ्या सुखदुःखाला आध्यात्मिक ताप म्हणतात. हें आध्यात्मिक दुःख दोन प्रकारचें आहे.

शारीरिक व मानसिक. यद्यपि सर्व दुखें मनापासून होतात म्हणजे तीं दुःखें शरीराला मनाच्याच अपेक्षेने भासतात; तरी प्रधान गौणतेने हे भेद आहेत. राग, लोभ हे मनालाच कळतात व चिमोटा घेतला असतां तो शरीराला कळतो. अप्रिय संयोग म्हणजे आपल्यास जें आवडत नाही तें जवळ येणें व प्रिय वियोग म्हणजे आवडतें तें दूर जाणें हें मानसिक दुःख होय. आता आधिभौतिक दुःखाचें लक्षण.

सर्वभूतैर्देहयोगात् सुखंदुःखं यदा भवेत् ।
द्वितीयंतु विजानीयात संतापंचाधिभौतिकम् ॥

सर्व भूतापासून होणारें जें दुःख तें आधिभौतिक होय. हें दुःख चार प्रकारचें आहे. जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज. हीं सुखदुःखें आपल्यास कर्माप्रमाणे प्राप्त होतात. वाघ पाळला असता दरवेशांना पैसे वगैरे मिळून सुख होतें पण तोच वाघ बिघडला तर त्यापासून दुःखहि होतें.

**शिष्यः**— महाराज ! सर्व भूतापासून मनुष्याला सुख कसें होतें ? कारण मनाला कांही वैरी, कांटा, व्याघ्र, सर्प वगैरे नाहीत ?

**गुरुः**— म्हणूनच 'देह योगात्' असे शद्ब स्मृतींत आहेत. हीं दुखें देहासक्तिमुळे होतात. आता तिसरें " आधिदैविक " दिव प्रभवं दैवं स्वर्गांतून देवापासून होणारें जें दुःख तें आधिदैविक होय. हें आधिदैविक दुःख जिवंतपणीहि होतें व मेल्यावरहि होतें. जिवंतपणी ग्रहादिकापासून पीडा होणें, तसेंच वायूप्रलय म्हणजे अनियमित वायू वगैरे सुटणें, हे देवांच्या इच्छेमुळे होतें. व मेल्यावर यमयातनादि दुःखें वगैरे भोगावीं लागतात. हीं सगळी आधिदैविक होत ह्याविषयी असें एक वचन आहे.

शुभाशुभैः कर्मभिस्तैर्देहति यमयातना ।
स्वर्ग नरकादिभोक्तव्यं सर्वं दुःखं विवेकिनः ॥

**शिष्यः**— महाराज ! स्वर्ग तर पुण्याने प्राप्त होतो. मग या श्लोकांत स्वर्गहि दुःखांतच घेतला हें कसें ?

**गुरु**:–अरे बाळ ! ज्या पुण्यापासून परमात्मा दूर होतो तें पुण्य व्यर्थ आहे. सर्वं दु:खं विवेकिन: ।। म्हणजे विवेकी जे आहेत ते सुखालाहि दु:खच मानतात. आपलें कर्म जसजसें प्रबल असतें त्या मानानें सुखदु:खेंहि प्राप्त होतात; म्हणजे ती पाप पुण्याच्या तीव्रतेवर अवलंबून आहेत.

त्रिभिर्वर्षै: त्रिभिर्मासै: त्रिभि: पक्षैस्त्रिभिर्दिनै: ।
अत्युत्कटै: पापपुण्यै रिहैव फलमश्नुते ।।

या वचनावरून माझें म्हणणें स्पष्ट होते. आजपर्यंत ज्या अलौकिक गोष्टी सत्पुरुषांनी केल्या आहेत त्या पुण्यामुळेच केल्या आहेत म्हणून दु:खत्रय दूर करण्याकरिता जिज्ञासाच करावी. आता प्रात्यक्षिक दु:ख नाशेच्छा तर सगळयांचीच होते पण ब्रह्म जाणण्याची इच्छा मात्र शद्ब प्रमाणाशिवाय होत नाही.

**शिष्य**:– महाराज ! आयुर्वेदिक पद्धतीने शारिरिक व मानसिक या दोन्ही प्रकारच्या आध्यात्मिक दु:खांचा नाश होतो. अशा कांही औषधी आहेत की, त्या खाल्ल्याने विरुद्ध विकार उत्पन्न करून क्रोधादिकांचा नाश होतो. जसे, बायको दूर गेली तर अशा प्रकारचें मानसिक दु:खहि औषधाने दूर होतें. ती औषधी खाल्ली असतां दुसराच विकार उत्पन्न होऊन कामविकार शमास पावतो. याविषयी चरक संहितेंत प्रमाण आहे तें असें.

क्रोधजो याति कामेन शांतिक्रोधेन कामज: ।

म्हणजे क्रोधाचा ज्वर कामाने शांत होतो; व भय शोकाचा ज्वर काम क्रोधाने निघून जातो. म्हणजे मिश्र विकार मिश्र वृत्तीनेच दूर होतो. मात्र या औषधी पारकीय वैद्यांना सापडल्या नाहीत. असो. तर या आध्यात्मिक दु:खांचा नाश जसा औषधीने होतो, तसा आधिभौतिक दु:खांचा नाशहि मंत्र, रक्षा वगैरे यांच्या योगाने होतो. जिवंतपणीं आणि मेल्यावर होणारे विकार जे आधिदैविक दु:ख त्याचाहि नाश ग्रह शांत्यादिकांनी होतो. म्हणून हे सगळे उपाय दृष्ट असल्यामुळे सांख्याच्या ठिकाणीं मला जिज्ञासा होत नाही.

**गुरु**:– अशा तुटपुंज्या प्रमाणावरून जर तुझी सांख्याच्या ठिकाणची जिज्ञासा लुप्त होते तर तुझें हें बरेंच धाडस समजलें पाहिजें. परंतु त्वा सांगितलेल्या दृढ उपायांनी दुःखाचा आत्यंतिक नाश होत नाही. कारण रोग हे एकमेकांना प्रतिकूल असतात. उदा. उष्णवात. म्हणून औषधीच्या योगाने थोडें बल आणून दुःखांच्या आत्यंतिक नाशाकरिता जिज्ञासाच केली पाहिजे. आता दुःखांचा आत्यंतिक नाश जो सांगतात त्यांत ही खुबी आहे, ती तुझ्या ध्यानांत न आल्याने आयुर्वेदीय पद्धति तुला विशेष आवडली असें दिसतें. ती खुबी हीच की, औषधादिकांनी दुःखाचा ध्वंस होतो. आत्यंतिक निवृत्ति होत नाही. ध्वंस म्हणजे पूर्वी दुःख असून मग त्याचा नाश होणें व तें पुन्हा प्राप्त होण्याचा संभव असणें. हा ध्वंस सांख्य मानीत नाहीत. नैय्यायिक मानतात.

आता आत्यंतिक नाश म्हणजे केव्हाच दुःख झालें नाही. अशा प्रकारची स्थिति पूर्वी, आता व पुढे केव्हाच दुःख नसणें तो आत्यंतिक नाश होय. "नैकांतात्यतंतोऽभावात् ॥ तर कारिकाकार सांगतात की, हे रक्षा मंत्रौषधी ग्रहशांत्यादि दृष्ट उपाय त्रिविध दुःखांचा आत्यंतिक नाश करण्यास समर्थ होत नसल्यामुळे सांख्याचें ठिकाणीं जिज्ञासाच अवश्य करावी.

**शिष्य**:– महाराज ! त्रिविध दुःखनाशार्थ दृष्ट उपाय खोटा असेल पण "योऽश्वमेधेन यजति समृत्युंतरति" म्हणजे "सोम पिऊन अमृत होऊं" अशा प्रकारच्या वेदोक्त उपायांनी सांख्याच्या ठायीं जिज्ञासा निरर्थक ठरत नाही काय ?

**गुरु**:– अरे, तूं अगदी वेडा आहेस. तूं म्हणतो त्या वेदोक्त उपाया-हून आणखी मोठे उपाय त्वा जरी सांगितलेस तरी सांख्य शास्त्राची जिज्ञासा कांही निरर्थक ठरत नाही. तुझ्या प्रश्नाचें उत्तर पुढच्याच कारिकेंत सांगतात.

दृष्टवदानुश्रविकः सत्यविशुद्धिक्षयातिशययुक्तः ।
तद्विपरितः श्रेयान् व्यक्ताव्यक्तज्ञ विज्ञानात् ॥२॥

या कारिकेंत तुझ्या म्हणण्याप्रमाणे वेदोक्त उपायानेहि दृष्ट उपाया-प्रमाणेच त्रिविध दुःखांचा नाश होत नाही असें सांगतात. आनुश्रविक म्हणजे कोणी रचलेला नसून परंपरेने ऐकू येणारा. वेद, व्यक्त म्हणजे जग. अव्यक्त म्हणजे प्रकृति व ज्ञ म्हणजे जाणणारा पुरुष. भाष्यकार म्हणतात अश्वमेधादिक व आनुश्रविक किंवा वेदोक्त उपाय आहेत त्यांत पशू मारणें, घोड्याशीं समागम करणें वगैरे गोष्टी असल्यामुळे तो उपायहि "अविशुद्धि क्षयातिशययुक्त "आहे.

**शिष्य**:— महाराज! यज्ञांत पशुहिंसा करणें वगैरे हे मार्ग श्रुति स्मृति लिहित असल्यामुळे ते विधियुक्त नाहीत काय?

**गुरु**:— विधि म्हणजे काय हेंच तुला अगोदर माहित नाही. अरे! जी गोष्ट माहित नाही ती सांगणें त्याला विधि म्हणतात. पण मास खाणें वगैरे या गोष्टी लोकांना माहितच आहे. तर मास वगैरे फार खाणारे जे आहेत त्यांच्याकरिता हा पशुहिंसादि मार्ग श्रुतिस्मृतिमध्ये सांगितला आहे. म्हणजे अर्थातच त्याच्यापासून त्याची निवृत्ति व्हावी हाच त्यांत उद्देश आहे. तीच गोष्ट मैथुनाची. परस्त्रीशीं संयोग करणें निषिद्ध असल्यामुळे, स्वस्त्रीशींच संयोग करावा असा विधि श्रुतीने लावून दिला आहे. तरी त्यांची एकंदर दृष्टि निवृत्तिपरच आहे. कारण अपत्य होत पर्यंतच स्त्रीशीं गमन करावें, तेहि ऋतुकालींच करावें. अपत्य झाल्यानंतर स्त्रीच्या इच्छेनेंच गमन करावें इत्यादि विशेष नियम सांगून शेवटीं वैराग्य झालें नाही तोपर्यंत स्वस्त्रीशीं गमन करावे व वैराग्य झाल्या-बरोबर संन्यास घ्यावा असें सांगितलें आहे. सारांश, विषयांचे ठिकाणीं वैराग्य इष्ट असल्यामुळे यावत् वैराग्य, विषयी पुरुषांना विधीने विषय-सेवन सांगितलें आहे. म्हणून वैराग्य होतपर्यंतच विधि पाळला पाहिजे. तर याप्रमाणे वेदोक्त उपायांचें खंडन कर्मकांडानेच इष्ट आहे. म्हणून या ठिकाणीं अविशुद्धि येते. व या उपायांच्या ठिकाणीं क्षयातिशयहि आहे. कारण याच्या योगाने संपादन केलेल्या पुण्यकर्माचें फल स्वर्गा-दिक असून, या पुण्याचा क्षय "क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशति" या वचनाप्रमाणे केव्हा तरी होणार असल्यामुळे पुण्य सरल्याबरोबर पुन्हा

हीं दुःखें उद्भवण्याचा संभव आहे. यावरून स्वर्गालाहि क्षयातिक्षय आहे असें ठरतें. म्हणून हा वेदोक्तहि उपाय टाकून देऊन "तद्विपरित" उपायाचा स्वीकार करावा; व हा तद्विपरित उपाय म्हटला म्हणजे "चित्तवृत्तीचा निरोध" करणें हाच आहे, असें सांगून "श्रेयान्" पदावरून तो व्यर्थ जाणार नाही असें सुचविलें.

**शिष्यः**—महाराज ! वास्तविक पाहतां त्रिविध दुःखाची निवृत्ति होणें, म्हणजेच मोक्ष मिळणें होय, असें असतां पुन्हा त्याला खाली कां यावें लागतें हें समजत नाही.

**गुरुः**— अरे ! तुझे हें मोक्षाचें लक्षणच मुळी चुकतें. कारण भोगलेल्या दुःखांची निवृत्ति कोणास करावयाची नसते. तशीच भोगत असलेल्या दुःखाचीहि नसते. तर "हेयं दुःखमनागतम् ॥" म्हणजे पुढे येणाऱ्या दुःखांचीच निवृत्ति करावी लागते. म्हणून पुढे येणारीं दुखें दूर करणें हाच मोक्ष होय. असा सगळ्या शास्त्रांचा समज आहे.

**शिष्यः**— महाराज ! पुढे दुःख येणार हें आपण कशावरून समजावें ?

**गुरुः**— ज्याप्रमाणे बादल पाहून आपण पावसाचे अनुमान करतो त्याप्रमाणे जोपर्यंत राग द्वेष आहेत तोपर्यंत हीं दुःखें कधीतरी प्राप्त होणारच असें समजावें. म्हणून दुःखें आल्यावर तीं भोगत बसण्यापेक्षा आधीच त्याची निवृत्ति करणें बरें. व पुढे येणारीं जरादिक दुःखें तरुणपणांतच दूर होतात. म्हणून पंचविंशति तत्वाचें ज्ञान करून घेऊन त्रिविध दुःखाचा आत्यंतिक नाश करावा. आता २५ तत्वें कोणतें तें सांगतात. "व्यक्ता व्यक्तज्ञ विज्ञानात्." व्यक्त, अव्यक्त आणि ज्ञ या तीन तत्त्वांत पंचवीस तत्त्वांचा समावेश होतो. व्यक्त म्हणजे मन व इंद्रियें यांना गोचर व यांना गोचर नाहीं तें अव्यक्त. आणि ज्ञ म्हणजे पुरुष. पंचतन्मात्रा इंद्रियांना गोचर आहेत. आता या पंचतन्मात्रा, १६ विकार म्हणजे पंचमहाभूतें, पंच कर्मेंद्रियें, पंच ज्ञानेंद्रियें व एक मन असें १६. यांतील मन हें उभयात्मक आहे. कार्य करण्याचें वेळीं कर्मेंद्रियाकडे व जाणण्याचें वेळीं ज्ञानेंद्रियाकडे धावतें. तें मन व निश्चय

करते ती बुद्धि. आणखी अहंकार. असें हें तेवीस मिळून व्यक्त म्हणतात. आता व्यक्त हें जड आहे तर चैतन्यापासून त्याची उत्पत्ति संभवत नाही. म्हणून जडाचें कारणहि जडच असलें पाहिजे. परंतु तें आपल्या मनास व इंद्रियांस गोचर नसल्यामुळे अनुमानानेच कल्पावें लागतें तेंच अव्यक्त. व यांना जाणणारा तो पुरुष किंवा ज्ञ होय. असें हें तीन तत्त्व जाणलें असतां त्रिविध दुःखांचा नाश होतो, हें तुला सांगितलें. आता या तीन पदार्थांत कोण विशेष आहे ते पुन्हा कारिकेंत सांगतात.

मूलाप्रकृति रविकृतिर्महदाद्याः प्रकृति विकृतयः सप्त ।
षोडशकस्तु विकारो न प्रकृतिर्न विकृतिः पुरुषः ।।

मूल प्रकृति ही अविकृत्ति आहे. स्वतः कशाचेंच कार्य नसून ज्याच्यापासून कांही उत्पन्न होते ती प्रकृति. कारण व स्वतः दुसऱ्या पदार्थाचें कार्य असून ज्याच्यापासून कांही उत्पन्न होते ती प्रकृति विकृत्ति. आणखी दुसऱ्या पदार्थापासून उत्पन्न होऊन ज्याच्यापासून कांहीच उत्पन्न होत नाही ते विकार. आता बुद्धि, अहंकार व पंचतन्मात्रा ह्या पुढच्याचें कारण व मागच्याचें कार्य आहे म्हणून त्या सात महदादि पदार्थांना प्रकृति त्रिकृति म्हटलें आहे. जसें बुद्धि ही प्रधानापासून झाली व बुद्धीपासून अहंकार झाला म्हणून ती अहंकाराचें कारण व प्रधानाचें कार्य आहे. बुद्धीपासून अहंकार व अहंकारापासून पंचतन्मात्रा झाल्या म्हणून अहंकार हा पंचतन्मात्राचें कारण व बुद्धीचें कार्य आहे. तसेंच अहंकारापासून पंचतन्मात्रा व त्यांच्यापासून पंचमहाभूतें हीं झालीं, म्हणून पंचतन्मात्रा या महाभूतांचें कारण व अहंकाराचें कार्य आहेत. असे हे सप्त पदार्थ प्रकृति विकृति कसें हे तुला सांगितलें. आता महाभूतादि १६ पदार्थ हे पंचतन्मात्राचें कार्य आहेत; परंतु त्यांच्यापासून कांही उत्पन्न होत नाही, म्हणून त्यांना षोडष विकार म्हणतात. या प्रमाणे मूल प्रकृति, प्रकृतिविकृति आणि विकार हे तुला स्पष्ट करून सांगितलें.

आता राहिला पुरुष. तर हा "न प्रकृतिर्न विकृतिः" अशा प्रकारचा आहे. म्हणजे तो कोणापासून उत्पन्न झाला नाही व त्याच्यापासून कांही

उत्पन्न होतहि नाही. असो, तर याप्रमाणे तुला व्यक्त व अव्यक्त आणि ज्ञ म्हणजे पुरुष यांत हाच विशेष आहे हें सांगितलें.

आता ह्या व्यक्ताव्यक्तज्ञ तीन पदार्थांची सिद्धि ज्या प्रमाणांनी होते तें तुला उद्या पुढच्या कारिकेंत सांगतील.

श्री मत्सग्दुरु ज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु

---

श्री ज्ञानेश्वर पांडुरंगमाउली

# २४

**गुरू**:– आता प्रमाणांचें निरूपण सांगण्यापूर्वी मागच्या विषयाचें थोडे सिंहावलोकन करून सांख्य शास्त्रांत पुरुषाचें निरूपण विशेष कां मानतात तें सांगतो.

**शिष्य**:– भगवन्, तत्व कोणी वीस मानतात, कोणी बावीस मानतात, कोणी चोवीस मानतात, कोणी अठ्ठावीस व कोणी ३६ मानतात, हें कसें ?

**गुरु**:– हे सर्वच बोध करण्याला योग्य आहेत; म्हणून किट् किट् करण्यांत अर्थ नाही. भगवान म्हणतात, माझी माया ग्रहण करून काय एक संभवत नाही. असो. सांख्यांत सर्व दर्शन संग्रहकार चार पदार्थ स्थापन करतात. त्यांत प्रथम प्रकृतिः– जिच्यापासून सगळे उत्पन्न होतात पण जी कोणापासून उत्पन्न होत नाही ती. जसें, माती ही घटाची प्रकृति आहे. तर स्वतः कोणापासून उत्पन्न होत नाही पण जिच्यापासून सर्व उत्पन्न होते ती प्रकृति. जें स्वतः दुसऱ्यापासून उत्पन्न होतात व आपल्या-पासून उत्पन्न करतात ते प्रकृति विकृति. जे दुसऱ्यापासून उत्पन्न होतात पण त्यांच्यापासून दुसरा पदार्थ उत्पन्न होत नाही ते विकृति व उत्पन्नहि होत नाही किंवा उत्पन्न करीतहि नाही ती असंगता (पुरुष). हे चार पदार्थ सांगितले. आता स्पष्टीकरण सांगतो. मूलप्रकृतिरविकृतिः—मूल प्रकृतिः– येथे प्रकृति म्हणजे मूलं=कारणं तदेव प्रकृतिः। मूल म्हणजे सर्वांचें कारण म्हणजे उत्पन्न करणारे तीच प्रकृति म्हणावी. ही अविकृति आहे. यापासून सर्व उत्पन्न होतात म्हणून मूळ. ती कोणाची विकृति नाही म्हणून अविकृति.

**प्रश्न**:—नुसती प्रकृतिच कां नाही म्हटलें ?

**उत्तर**:–नुसती प्रकृतिच म्हटलें असतें तर ती जगाचें कारण कशावरून अशी शंका आली असती. म्हणून मूल प्रकृति म्हटलें. मूल म्हणजे कारण. ती कोणापासून उत्पन्न झाली नाही, म्हणून अविकृति शब्द घातला अथवा मूल म्हणजे सर्व बंधनाचें कारणहि आहे तिच्यापासून सर्व संसाराचें बंधन आहे म्हणून मूल प्रकृति म्हटलें.

**प्रश्न**–मग नुसता मूल शब्द घातला असतां तर चाललें असतें.

**उत्तर**–नाही. नुसतें 'मूल' म्हटल्यानें जगत् उत्पन्न होत नाही अशी शंका आली असती, म्हणून प्रकृति शब्द घातला व ही जशी जगाला कारण आहे तसें हिलाहि कारण असेल ही अनवस्था निराकारण करण्याकरिता अविकृति शब्द घातला. अथवा मूलं=मूल=कारण म्हटलें नसतें तर कारणाचें ठिकाणीं नैय्यायिक परमाणू कारण मानतात. त्याच्यावर अतिव्याप्ति झाली असती, ती होऊं नये म्हणून मूल शब्द घातला.

**प्रश्न**:–अतिव्याप्ति म्हणजे काय ?

**उत्तर**:–दुसऱ्या पदार्थावर लक्षण जाणें ती अतिव्याप्ति. लक्षण कमी पडणें ती अव्याप्ति व भलतेंच लक्षण करणें तो असंभव. हे तिन्ही दोष निवारण करून लक्षण करावें. "असाधारणधर्मकथनम् लक्षणम्" उदा. जिला खूर आहे ती गाय असें गाईचें लक्षण केलें तर खूर असलेल्या इतर प्राण्यावर अतिव्याप्ति होते. काळी गाय म्हटल्यास नीलादिकांवर अव्याप्ति होते. 'एकशफत्वं गोर्लक्षणम्' असें लक्षण केलें तर भलतेंच लक्षण झालें. हा असंभव होय. म्हणून "सास्नादिमत्वं गोर्लक्षणम्" हें योग्य लक्षण झालें. आता 'मूल प्रकृति' येथे मूल शब्द घातला नसता तर परमाणूवर अतिव्याप्ति झाली असती. नुसता अविकृतिच शब्द घातला असतां तर बौद्ध शून्य अविकृत मानतात त्यावर अतिव्याप्ति झाली असती व नैय्यायिक आकाशाची उत्पत्ति कोणापासूनच मानीत नाहींत. त्यावरहि अतिव्याप्ति झाली असती, किंवा अविकृतिच शब्द घातला असतां तर पुरुषावर अतिव्याप्ति झाली असती; कारण पुरुषहि कोणापासून झाला नाही.

याप्रमाणे मूल प्रकृतीचें लक्षण सांगितलें तेंच जगाला कारण आहे.
ा कार्य सांगतातः– "महदाद्याः प्रकृतिविकृतयः सप्त." महदादिक
ते प्रकृति विकृतिक पदार्थ म्हणावे. महत्=बुद्धि=निश्चय. अज्ञाना-
ा निश्चय येतो. उदा. कांही अंशासी परिचित उदाहरण जुळतें.
गेल्याच्या मागच्या वर्षी म्हणजे तिगस्ता पंचदशी विकत देऊन
हात्म्य घेतलें होतें ही आठवण कोठून आली ? तर समजत नव्हतें
आली म्हणजे अज्ञानांतून आली. अज्ञानच प्रकृति होय. प्रकृतिपासून
म्हणजे निश्चय प्रथम झाला. नंतर मी आहे असें मानतो.
कार). येथे थोडा विवेक आहे:–अहंकार चैतन्याचा आहे. जाणण्याची
र बुद्धि फिरणें तो अहंकार व केवळ जाणीव हा दुसरा. असा दोन
रचा अहंकार आहे. देहाकार बुद्धि होणें हा विपरीत अहंकार होय.
ज्ञानापासून होतो. अहंकरोति इति अहंकारः । अहंकारामुळे कर्तृत्व
क्तृत्व येतें. उदा. मी मारण्यास गेलो. तर मारतेपणाचा अहंकार
ाशिवाय मारण्याचा निश्चय झाला नाही. म्हणजे बुद्धिपासून
ार झाला. याप्रमाणे अहंकार बुद्धीची विकृति झाली व बुद्धि अहं-
ची प्रकृति झाली. तसाच अहंकार तन्मात्रांची प्रकृति आहे व
दि पंचतन्मात्रा अहंकाराची विकृति आहेत. याप्रमाणे महदादिक सात
ाची प्रकृति व मागच्याची विकृति आहेत.

**प्रश्न**:–अहंकारापासून पंचतन्मात्रा एकदम कशा उत्पन्न झाल्या ?

**उत्तर**–याचें स्पष्टीकरण असें. जिभेला रस समजतो, पण स्पर्श
ल्याशिवाय नाही समजत. जिभेला स्पर्श केला तर कांही शब्द
येतो. यावरून आघात आहे तेथे नाद उठत असतो. म्हणजे शब्दांत
आहे. म्हणून हे एकदम उत्पन्न झालें. अहंकारापासून एकदम
न्मात्रा उत्पन्न झाल्या. परंतु हा पुढचा विषय पहिलेच सांगितला तर
अरुचि उत्पन्न होते. असो. अहंकारापासून पंचतन्मात्रा, कर्मेंद्रियें व
द्रियें हीं उत्पन्न झालीं व शब्दतन्मात्रेपासून आकाश, गंधतन्मात्रे-
ा पृथ्वी, रूपतन्मात्रेपासून तेज याप्रमाणे तन्मात्रापासून स्थूल भूतें
ा झालीं. याविषयीं मूळ शास्त्रांतील कपिलाचार्यांचें सूत्र आहे तें असें

सत्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृतिः प्रकृतेर्महान् महतोऽहंकारोऽहंकारात्पंचतन्मात्राण्युभयमिंद्रियं तन्मात्रेभ्यः स्थूलभूतानि पुरुष इति पंचविंशतिर्गणः ।। (अ १ सूत्र ६१).

सांख्य वास्तविक एकच इंद्रिय मानतात. परंतु स्थानभेदाने त्याच्या शक्ति प्रकट होतात म्हणून दहा इंद्रियें म्हटलीं आहेत.

**प्रश्न**:—योग्य स्थान सोडून इंद्रियांची शक्ति प्रकट होईल काय ?

**उत्तर**:—होय. उदा. वास घेण्याची शक्ति पायांतून प्रगट केली तर पायाने वास येईल.

**प्रश्न**:—सांख्यांत जड प्रकृतीचा विचार केला असल्यामुळे या शास्त्राचा उपयोग आहे काय ?

**उत्तर**:—औषधी जड दिसते पण तिच्या प्रभावाने रोग दूर होतात. तसे सांख्यशास्त्रांत प्रकृतीचा विचार केला आहे तथापि ते अलौकिकपर शास्त्र असल्यामुळे फार उपयोगाचें आहे. असो. तर वर सांगितल्याप्रमाणे पंचतन्मात्रापासून उत्पन्न झालेलीं स्थूल भूतें ५, व पंच कर्मेंद्रियें, पंच ज्ञानेंद्रियें, व एक मन मिळून १६ विकार झाले. वास्तविक एकच इंद्रिय आहे म्हणून पांच भूतें व एक इंद्रिय असे सहाच विकार आहेत. या ठिकाणीं रहस्यवाद व प्रकाशवाद असे दोन भेद आहेत. प्रत्येक शास्त्रांत असे दोन भेद असतात. वर १६ विकार सांगितले ते बालबोधार्थ सांगितले. वास्तविक सहाच विकार आहेत पण (सहा विकार) हा गुप्तवाद आहे.

**प्रश्न**:— वर जें १६ विकार सांगितले त्यांच्यापासून सृष्टीची उत्पत्ति होते. हें प्रत्यक्ष दिसत असून त्यांना विकार कां म्हटलें ?

**उत्तर**:— पंच महाभूतापासून जगत् उत्पन्न होत नाही. जसे घटादि पदार्थ पृथिव्यादिकापासून होतात म्हणजे उत्पन्न होतात असे नाही. म्हणजे घट हा मातीपासून किंवा गार पाण्यापासून उत्पन्न होत नाही. उत्पत्ति म्हणजे परिणाम. उदा. तूप हा दुधाचा परिणाम आहे. तुपाचें फिरून दूध नाही होत. तशी घटाची उत्पत्ति नाही. किंवा—गार—कमी

जास्त प्रमाणाने पाण्याची गार होते पण रूप तेंच आहे; त्याप्रमाणे डोळ्यापासून, नाकापासून, कानापासून कांही उत्पन्न होत नाही.

**प्रश्न**:—मनापासून स्वप्नांतले पदार्थ उत्पन्न होत नाहीत ?

**उत्तर**:—मनापासून कांहीच उत्पन्न होत नाही. स्वप्नांतले पदार्थ उत्पन्न होत नाहीत; तर मनच तें पदार्थ बनतें.

**प्रश्न**:—वेदांतांत मनालाच सृष्टीचें कारण मानलें आहे, हें कसें ?

**उत्तर**:—वेदांती मन म्हणजे सांख्याची बुद्धि. सांख्याचें मन चंचल आहे असो. याप्रमाणे १६ विकार सांगितले. आता ही खटपट, ज्याच्या-करिता करावयाची तो पुरुष—आत्मा सगळयास जाणतो. तो प्रकृति नव्हे. व विकृतिहि नव्हे. "न प्रकृतिर्न विकृतिः पुरुषः" तो कोणापासून उत्पन्न होत नाही व कोणास उत्पन्न करीतहि नाही.

**प्रश्न**:—मग अशा अनुपयुक्त पुरुषांचें निरूपण कशास ?

**उत्तर**:—आपलेंहि स्वरूप असेंच आहे. उत्पत्ति वगैरे आपल्या-पासून नाही. दुसऱ्यापासून म्हणजे प्रकृतिपासून आहे तर तिच्याशीं आपला कांही संबंध नाही असें वाटल्याशिवाय त्रिविध दुःख निवृत्ति होणार नाही. आपण उत्पत्त्यादिक धर्माहून निराळे आहोत असें कळेल तरच त्याहून वेगळे होऊन त्रिविध दुःखांची निवृत्ति करून घेऊं. म्हणून पुरुषांचें निरूपण आहे. दुसरें, या शास्त्राचें तात्पर्य जगाचा शोध करण्यांत नाही. कारण प्रकृति शोधली म्हणजे झालें. तर या महाकवाटांतून सुटण्याच्या इच्छेने यांनी पुरुषाचें निरूपण केलें आहे. म्हणजे या शास्त्राचें सृष्टींत तात्पर्य नाही. मोक्षांत आहे. म्हणून हे श्रुतिविरूद्ध केंव्हाच होऊं शकत नाही.

श्री पांडुरंगमाउली चरणयोस्समर्पणमस्तु

---

।। श्री ज्ञानेश्वरमाउली प्रसन्न ।।

# २५

## विशेष व्याख्यान

श्लोक:– कपिल चरणचारु वंदुनि प्रेमभावें ।
विहित चरित साचे वर्णुनि सांख्यभावें ।।
तम दुरिदुरिताचें नेउनियां स्वभावें ।
परमपदीं ममास्था सिद्ध हो ब्रम्हभावे ।।१।।

कारिका– मूलप्रकृतिरविकृतिर्महदाद्या: प्रकृतिविकृतय:
सप्त षोडशकस्तु विकारो न प्रकृतिर्न विकृति: पुरुष: ।।३।।

काल कारिकेचें भाष्याप्रमाणे व्याख्यान केलें. आता थोडे निराळ्या रीतीने व्याख्यान करतो. अशा विशेष व्याख्यानाची जबाबदारी मजवर आहे कारण तीं व्याख्यानें माझींच आहेत. काल अव्यक्त म्हणजे प्रधान (प्रकृति) असें सांगितलें. आता त्याचें लक्षण सांगतो. अव्यक्त म्हणजे अज्ञान असें स्मृतीच्या उदाहरणानें सांगितलेंच आहे. तेंच आणखी स्पष्ट करून सांगतो. कोणत्याहि गोष्टीची स्मृति म्हणजे आठवण कोठून येत असते ? तर ती अज्ञानांतून म्हणजे न समजण्यांतून येत असते. याविषयी पारकीय लोकांचें मत असें आहे की, स्मृति (आठवण) मेंदूतून येते असें तें म्हणतात. म्हणजे त्यांच्या मताप्रमाणे कोणत्याहि गोष्टीचे संस्कार आपल्या मेंदूवर राहतात व नंतर ते उद्भूत होतात. आता आपण जर यांना प्रश्न केला की, मेंदूत जर संस्कार राहतात तर ते कोणत्या रूपाने राहतात ? ठशाच्या (Impressions) रूपाने राहतात असें म्हणत असल्यास मेंदू फाडून पाहिला असतां ते संस्कार दिसत नाहीत; म्हणून त्यांचें म्हणणें बरोबर नाही. बरे, संस्कार दिसत नाहीत पण मेंदूवर

राहतात असें म्हटलें तर मेंदूवर संस्कार कसे राहतात ? व संस्कार राहतात हें समजतें किंवा नाही ? समजतें तर समजण्याला दुसरा मेंदू पाहिजे. अशा रीतीने अनवस्था प्रसंग येतो व समजत नसलें तर मग अज्ञानांत संस्कार राहतात हें आमचेंच म्हणणें खरे–किंवा–ते संस्कार जडावर राहतात असें म्हटल्यास पुन्हा आपण त्यांना विचारूं की, तुमचें जड व्यक्त आहे किंवा अव्यक्त आहे ? व्यक्त म्हटलें तर दिसत नाही. अव्यक्त म्हटल्यास मग आम्ही म्हणतो तेंच बरोबर आहे. तर मूलाज्ञानांत संस्कार राहतात हें खरें. हें अज्ञान त्रिगुणात्मक आहे. या प्रधानांत तीन गुण कसे आहेत ते सांगतो.

परंतु सगळा सत्व, सगळा रज किंवा सगळा तम हे उदाहरणांत घेतां येत नाहीत. जसें झाड म्हटलें म्हणजे सगळे वन घेत नाही तर एकच झाड घेतो. तद्वत् प्रकृति ही त्रिगुणात्मक आहे. हें उदाहरणांवरून सांगण्याकरिता सगळाच सत्व, सगळाच रज किंवा सगळाच तम घेण्याची जरूरी नाही. त्या प्रत्येकाचे अंश घेतल्याने होते. भगवान् म्हणतात,

तत्र सत्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ गीता ॥ १४।६

ज्ञान व सुख हे सत्वाचे धर्म आहेत. ज्ञान=स्मृति

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ गीता ॥ १४।७

प्रवृत्ति, चांचल्य व दुःख हे रजाचे धर्म आहेत.

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ गीता ॥ १४।८

प्रमाद, आलस्य, निद्रा वगैरे तमाचे धर्म आहेत. तर प्रकृतींत तीन गुण आहेत हें सांगण्याकरिता आपण तीन गुणांचे तीन अंश (उदा. घेण्यासारखे) ठरवूं. "प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव" असें गीतेंत म्हटलें आहे. प्रकाश म्हणजे ज्ञान किंवा स्मृति–हा सत्वगुण. रजाचे धर्म, प्रवृत्ति, चांचल्य व दुःख व तमाचे शोक व मोह हें वर

सांगितलेंच आहे. आता आपल्याला जेव्हा स्मृति येते तेव्हा ती अज्ञानांतून येते. तशीच शास्त्राची स्मृतीहि अज्ञानांतून येते. "बैय्याकरण किराता" हा श्लोक आतापर्यंत अज्ञानांत होता. आत्म्यांत नव्हता व देहांतहि नव्हता. देहांत असतां तर देह नित्य भासतो तसा तो नित्य आठवला असता. तसेंच वैराग्यहि अज्ञानांतूनच येतें. एखाद्या वेळेस जगत तुच्छ वाटतें. ही वैराग्याची वृत्ति अज्ञानांतूनच येते. म्हणून वैराग्यादि धर्म अज्ञानांतून येतात.

**प्रश्नः**—अज्ञानांतून येतात हें कशावरून म्हणतां?

**उत्तर**—न समजणें म्हणजे अज्ञान. ज्ञान, वैराग्य, सुख हे सत्वगुणाचे धर्म आहेत; म्हणून सत्वगुण अज्ञानांतून (प्रकृति) येतो हें ठरलें. तशीच प्रवृत्ति. चांचल्य व दुःख हे रजाचे धर्म आहेत. एखाद्या वेळेस आपल्यास स्त्रीची इच्छा होते. तीहि अज्ञानांतूनच होते. तसाच मोह. एखादे वेळेस आपल्यास शोक होतो तो देखील अज्ञानांतूनच येतो. सारांश, प्रकृतींत तीन्ही गुण आहेत म्हणून प्रकृति त्रिगुणात्मक आहे. आता हें तीन गुण जेव्हा साम्यावस्थेंत असतात त्यावेळेस तिला प्रकृति म्हणतात व विषमावस्थेंत असतात त्या वेळेस जगत म्हणतात. विषमावस्थेंत जेव्हा सत्वगुण प्रधान असतो त्यावेळेस जागृति असते. रजोगुण प्रधान असतो त्यावेळेस स्वप्नावस्था असते. तमोगुण प्रधान असतो त्यावेळेस निद्रा किंवा सुषुप्ति असते. हे प्रकार शरीरांतले झाले. आता ही सर्व सृष्टि त्रिगुणापासून झाल्यामुळे जड कशी आहे तें सांगतो. आत्म्याहून जेवढें भिन्न तेवढें जड समजावें. वैराग्य वगैरेहि जडच आहे. कारण आत्म्याहून भिन्न आहे म्हणून. आत्मा वैराग्यवान होणें म्हणजे तुच्छ रूपानें विषयवृत्तींत असणें. तसेंच ज्ञानहि जड आहे. कोणत्याहि पदार्थाचें ज्ञान होतें तेव्हा तो पदार्थ आपल्यास समजतो. उदा. हें पुस्तक आहे, हें आपल्यास समजतें किंवा नाही? समजतें. अर्थात पुस्तक व त्याचें ज्ञान वृत्तीवर आलें. म्हणजे पुस्तकाचा आकार व हें पुस्तक होय अशी ओळख ह्या दोन गोष्टी वृत्तीवर आल्या. म्हणजे त्याहून भिन्न तुम्ही झालें म्हणून हें ज्ञान जड झालें. मग आत्मज्ञान? हें या दर्शेत होत नाही. म्हणून हें ज्ञान जड आहे; म्हणजे त्याला कोण्यातरी गुणांत आणलें

पाहिजे. सारांश, हे ज्ञेयानुसारी ज्ञान सगळेंच जड आहे. वृत्तीपुढे जें ज्ञान येतें त्या ज्ञानांत आत्म्याचें ज्ञान होत नाही. म्हणजे वृत्ति तदाकार होऊन होत नाही. एवं घटाचें, देशाचें जें ज्ञान होतें तें जड आहे. याप्रमाणे सर्व सृष्टीचें एखाद्याला ज्ञान आहे तेंहि जडच समजलें पाहिजे. म्हणून सर्वज्ञपणाहि जडच झाला. यावरून ईश्वरपणहि जड झाला. तर सांख्यकार म्हणतात जीवाचें ज्ञान जड व तुच्छ आहे, तसें ईश्वराचेंहि ज्ञान जड व तुच्छ आहे. पंचदशीकार म्हणतात,

घटोऽयमिति सा उक्तिः आभासस्य प्रसादतः ।
विद्यातो घटमित्येवं ब्रह्मानुग्रहतो भवेत् ।।

घटाचा आकार व हा घट आहे हें समजणें चिदाभासाचें ज्ञान होय. व घट मी जाणला हें ज्ञान साक्षीला होतें. आकाराला अंतःकरणसहित आत्मा (वृत्तिचैतन्य) जाणतो व घटाच्या ज्ञानाला नुसता आत्माच जाणतो. असो. परंतु ईश्वराच्या ज्ञानांत विषय नाही. कारण तें ज्ञान अंतःकरणसहित नसतें. विषयाचें आकारावरून त्याचें (ईश्वराचें) ज्ञान झालें नसतें. आपल्याला अंतःकरणसहित ज्ञान होतें. म्हणजे आपल्या मनांत पदार्थाचा आकार पहिले येतो, म्हणून अंतःकरणसहित ज्ञान होतें. ईश्वराला अंतःकरणसहित ज्ञानाची अपेक्षा नाही. परंतु त्यांची सर्वज्ञता मात्र जड आहे. तथापि ईश्वराचें ईश्वरत्व या सर्वज्ञतेवर अवलंबून नाही. माझी माया मला ओळखतां येत नाही असें देवांनी भागवतांत म्हटलें आहे. त्यावर श्रीधरांची टीका आहे. उदा. मृगजळ केवढें आहे हें सूर्याला कळत नाही. पण मृगजळ न समजल्यामुळे सूर्यत्वाची हानी होत नाही. तद्वत् माया न समजल्यामुळे ईश्वरतेच्या सर्वज्ञतेला बाध येत नाही. कारण त्याला आत्मस्वरूपाची विस्मृति केव्हाच नाही.

**प्रश्न**–व्युत्थानदशेंत ईश्वराला स्वरूप ज्ञान असतें काय ?

**उत्तर**–ईश्वराला प्रारब्धच नाही, म्हणून प्रारब्धभोगार्थ त्याला व्युत्थानहि नाही. मुक्तांना आत्म्याचें ज्ञान जरी झालें तरी प्रारब्धभोगार्थ व्युत्थान आहे तसें ईश्वराचें नाही. हा अनुषंगिक उपमंत्र्य विराम

आहे. तात्पर्य, हें ज्ञान, वैराग्य सर्व जड आहे. म्हणून सत्वगुण जड ठरला. आता सत्वगुणच जड ठरला तर रज, तम हेहि जड झालेच. म्हणून हें अज्ञान (प्रकृति) त्रिगुणात्मक ठरलें. याप्रमाणे सर्व अज्ञानापासूनच उत्पन्न होतें. आता एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे की, अज्ञान हें जरी त्रिगुणात्मक आहे तथापि गुणाला स्वतंत्र उत्पन्न करूं शकत नाही. म्हणजे गुण स्वत: पृथक भासवूं शकत नाही, तर चैतन्य गुण भासवूं शकते. जसें. घट होण्याची शक्ति मातींत आहे पण माती कुलाला वांचून स्वतंत्र घट प्रकट करूं शकत नाही. तसें अज्ञानोपहित चैतन्यच तें गुण भासवितें. भगवान म्हणतात,

सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो
मत्त: स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ॥ गीता ॥ १५।१५ (१)

या गुणांना माझ्यावाचून अस्तित्वच नाही. मोह वगैरे माझ्यापासूनच उत्पन्न होतात. म्हणजे अज्ञानापासून होतात व मी भासवितो, पण यावरून स्वत: ईश्वरच त्रिगुणात्मक आहे असें नाही. भगवान म्हणतात,

विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृति संभवान् ॥

विकार व गुण हे प्रकृतिपासूनच उत्पन्न झालेले आहेत. याप्रमाणे हा परमात्मा गुणांचा चालक आहे. पुन्हा भगवान म्हणतात,

सत्वं रजस्तम इति गुणा: प्रकृतिसंभवा: ।
निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ गीता ॥ १४।५

अर्थात सत्व, रज, तम हे प्रकृतीचे गुण आहेत व ज्ञान, वैराग्यादि धर्म, सत्व गुणाचेच सांगितले आहेत. म्हणून हे गुण मूळ प्रकृतिचेच आहेत पण त्यांचें चालन=भासविणें हें चेतनापासून होते. " मत्त: स्मृतिर्ज्ञानमपोहनं च" यांत सांगितल्याप्रमाणे तें चेतनापासूनच भासतात असें ठरतें. जो परमात्मा या गुणांचें चालन करतो म्हणजे मायोपहित होऊन ते भासवितो, त्याला हें गुण लिप्त करीत नाहीत, म्हणजे ते गुण त्याला बाधत नाहीत तर निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ त्या गुणाबरोबर आपलेपणा मिसळून जें चैतन्य राहतें त्याला ते गुण बंधन करीत नाहीत, परंतु

मी ज्ञानी आहे, मी दु:खी आहे इत्यादि धर्म जो आपल्यावर ओढून घेतो तेवढ्यालाच ते बद्ध करतात. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

तैसी प्रकृति करी कर्मे....।

भगवान म्हणतात,

प्रकृते: क्रियमाणानि गुणै: कर्माणि सर्वश: ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ।। गीता ।। ३।२७

**प्रश्न**:– हा जीव प्रकृतीचे धर्म आपल्यावर वेड्याप्रमाणे कां ओढून घेतो ?

**उत्तर**:–हा प्रश्नच संभवत नाही, कारण हें दुसऱ्यास काय विचारावयाचे ? आपण आपल्यासच विचारावें. हा प्रश्न विचारला असतां एक फाडकन श्रीमुखांत देऊन विचारावें की, तूं वेडयासारखा प्रकृतीचे धर्म आपल्यावर कां ओढून घेतोस ? सारांश, अविद्या ही अनुभवाने सिद्ध आहे. युक्तीनें सिद्ध नाही. "प्रकृते: क्रियमाणानि" या श्लोकाचें तात्पर्य:– आत्मा आणि विमूढत्वमागत् इत्यर्थ: । कर्ताहमिति मन्यते ।। आत्मा जरी आहे तथापि अहंतेमुळे तो विमूढ झाला आहे; म्हणून मी कर्ता आहे असें म्हणतो. या ठिकाणीं कर्ता शब्द भोक्ता शब्दाचेंहि उपलक्षण करतो. पुन्हा भगवान म्हणतात,

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयो: ।
गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ।। गीता ।। ३।२८

हे प्रकृतीचे गुण आपल्यावर जो ओढून घेतो त्याला ते बांधतात. पण गुण हे आपणच आपल्यास वर्तन करवितात, मी त्यास कां मानावें असें म्हणून जो सोडून देतो तो स्वत: संगी होत नाही. अशा रीतीने एक आपल्या आंगावर कर्तृत्वाचा अहंकार घेतो व दुसरा मी कशाला किट् किट् करूं म्हणून सोडून देतो. तर मायोपहित परमात्म्याला हे गुण बांधत नाहीत.

प्रकृतेर्गुणसंमूढा: सज्जंते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मंदान् कृत्स्नविन्न विचालयेत् ।। गीता ।। ३।२९

परमात्मा प्रकृत्युपहित असतो तेव्हाच त्याला ईश्वर म्हणतात व तो ईश्वर गुणाला साक्षीभूत आहे. त्याची ओळख ब्रह्मांडांत होते. जेवढें त्रिगुणात्मक आहे तेवढें सगळे जड आहे हें मागे सांगितलें. यावत् ज्ञान् प्रकृति ही ब्रह्मांडाला व्यापक आहे. ज्ञान झाल्यावर ती नाहीच. जेवढें चैतन्य प्रकृतींत आलें तेवढा जीव. जीव हा अहंकार धारण करणारा आहे. हे जीव उपाधीमुळे जसें आकाश पृथक भासतें तद्वतच उपाधीच्या विभागानें आत्म्याचें विभाग भासतात. आता जो पदार्थ प्रकृतिपासून उत्पन्न झाला तो त्रिगुणात्मक असतो. म्हणून प्रकृतीचें पहिलें कार्य जी बुद्धि तीहि त्रिगुणात्मकच आहे.

**प्रश्नः**—चेतनाचा जो आभास प्रकृतींत आला, त्याला दुःखच कां झालें ?

**उत्तरः**—त्यानें आपल्याकडे न्यूनपणा घेतल्यामुळे हा आपल्याला न्यून मानतो, तेणेंकरून सुखदुःखें होतात. हे प्रकृतीचे गुण संक्रमण सगळ्या ब्रह्मांडांत चालू आहे. ही प्रकृति सर्व ब्रह्मांडास व्यापक आहे. तिच्यापासून झालेली बुद्धि हीहि ब्रह्मांडाला व्यापक आहे. पण प्रकृतिपेक्षा कमी मानानें. बुद्धि त्रिगुणात्मक आहे हें मागे सांगितलेंच आहे. बुद्धींतील सत्व गुणाचे अंशाला उपहित झालेला परमात्मा विष्णु होय. बुद्धींतील रजोगुणाचे अंशाला उपहित झालेला (त्या गुणाला भासविणारा) परमात्मा ब्रह्मा होय. व बुद्धींतील तमोगुणोपहित परमात्मा रुद्र होय. म्हणजे बुद्धीच्या सत्वगुणाला भासविणारा जो परमात्मा तो विष्णु, रजोगुणाला भासविणारा तो ब्रह्मा व तमोगुणाला भासविणारा तो शंकर होय.

**प्रश्नः**—ही विष्णुवादि रुपें जीवच घेतो काय ?

**उत्तरः**—नाही. हें कार्य ब्रह्माचें आहे, म्हणजे हीं रूपें जीव धरीत नसून परमात्माच धरतो. जीव बद्ध होतो, परंतु ते बद्ध होत नाहीत.

**प्रश्नः**—हा परमात्मा मूर्तिरूप आहे काय ?

**उत्तरः**—तो मूर्तिरूप नाही. अमूर्त आहे. कारण बुद्धि कांही मूर्तिरूप नाही. म्हणून हीं रूपेंहि भावनेनें होत नाहीत.

**प्रश्नः**—मग मूर्त विष्णवादि देव कसे झालेत ?

**उत्तर**.–हे मूर्त्युपहित विष्ण्वादि देव भक्तीच्या योगाने उत्पन्न झालेले असतात. रामतापनियोपनिषदांत म्हटलें आहे की,

निष्कलस्याद्वितीयस्य चिन्मयस्या शरीरिण: ।
उपासकानां कार्याथं ब्रह्मणो रुपकल्पना ।।

उपासकांच्या कार्यासाठी रूपाची कल्पना आहे म्हणून मूर्त विष्णु वगैरे हे सत्वगुणीच आहेत. अमूर्त विष्णु आदि हे मात्र सात्विक राजस व तामस आहेत. म्हणजे ते बुद्ध्युपहित होत्साते सृष्टीच्या कार्याकरिता त्रिगुणात्मक असून अमूर्त आहेत. परंतु मुर्त्युपहित हरिहरादि देव भक्तीनें सिद्ध आहेत व ते सत्वगुणीच आहेत. महाभारतांत म्हटलें आहे,

रुद्रोनारायणश्र्वैवेत्त्येकं सत्वं द्विधाकृतम् ।
लोकेचरति कौंतेयव्यक्तिस्थ: सर्व कर्मसु ।।

म्हणजे भक्तीच्या योगाने झालेल्या या हरिहरांच्या मूर्ती अनध्यस्तविवर्त आहेत व अविद्योपहित परमात्मा एकच आहे.

आता बुद्धिपासून अहंकार उत्पन्न होतो तोहि त्रिगुणात्मकच आहे. त्यांत तामस अहंकारापासून पंचतन्मात्रा उत्पन्न होतात. राजस अहंकारापासून सगळीं इंद्रियें उत्पन्न होतात. व सात्विक अहंकारापासून इंद्रियांच्या देवता (विष्णु आदिकरून) उत्पन्न होतात. याप्रमाणे अधिभूत, अधिदैव, व अध्यात्म सृष्टि उत्पन्न होते. म्हणजे पंचतन्मात्रा, दहा इंद्रियें, व त्याच्या देवता अशीं पंचवीस तत्वें झालीं. तन्मात्रापासून महाभूतें झालीं. यद्यपि इंद्रिय एकच आहे तथापि उपाधिभेदामुळे पृथक भासतात. याप्रमाणे षोडश विकार, इंद्रियांच्या दहा देवता, अहंकार, बुद्धि, प्रधान सत्वादि तीन गुण, त्यांच्या देवता व ईश्वर मिळून ३६ व सदतीसावा पुरुष म्हणजे ब्रह्म अशी हीं सदतीस तत्वें सांगितलीं. सर्व संतांचें मत असें एक आहे. अशी सृष्टीची उत्पत्ति झाली. आता देवता वगैरे कशा होतात हें व्याख्यान उद्या सांगू.

श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु.

---

॥ श्री ज्ञानेश्वरमाउली प्रसन्न ॥

# २६

मागील निरूपणाचा थोडक्यांत उपसंहार. सा एक एव प्रकृति रवि-द्याख्याइति मंदवारे उक्ता । सा एव पुनः सत्वरजतमात्मिका । ज्ञान वैराग्यादयः सत्वादयः अज्ञानादुत्पद्यंत । नहि चेतनंविना जडप्रवर्तते । सचेतनो भगवान् अहमेव इति भगवद्गीतायां उक्तम् "मत्तस्मृतिर्ज्ञानमपोहनंच" संस्कारजन्यज्ञानं स्मृतिः । ज्ञानमपिजडं । साक्षीभास्यत्वात् । अयं घटो । घटाकारवृत्तिरपिजडा । घटस्य जडत्वं चेतनान्नउत्पन्नम् । जडचेतनयोःविरोधात् । सत्वगुण जडः । रजस्तमसोर्काकथा । एतेगुणाः अज्ञानादेवउत्पद्यंत । तथापि तस्य प्रेरकः चेतनः । अज्ञानोपहित चैतन्यं । अज्ञानादेवप्रधानात् बुद्धिरुत्पाद्यते । गुणसाम्यावस्था प्रकृतिः । प्रकृतेर्महान् । यदा सृष्टेः उत्पत्ति कालो आगच्छति तदासाम्यावस्थायां न्यूनाधिक भावो भवति । स अज्ञानोपहित परमात्मा करोति । परमेश्वरस्यापि ज्ञानं जडं । तथापि ईश्वरत्वहानिर्नस्यात् । जडं त्रिगुण साम्यावस्थारूपं। प्रधाने तु सर्वे गुणाः साम्यावस्थायां तिष्ठंति । बुद्धौ तु न्यूनाधिकभावेन (विषमावस्थायां) तिष्ठंति । यत्तु विष्णवादि मूर्तीनां मूर्तीउपहितत्वं उक्तं तत्तु भक्ती हेतो । भक्ती हेतौ रजस्तमगुण ग्रहण प्रयोजन नास्ति भक्तौ ।

पुरुषः नित्य मुक्तः । अविद्यादिक्लेशैर्न कदापि बद्धः । जीव आदौ बद्धः पश्चात् मुक्तः । श्रोत्रमध्यात्मं । श्रवणमधिभूतं । अश्विनामधिदैवम् रसना अध्यात्मं । रसः अधिभूतः । वरुण अधिदैवम् । एवं सर्व इंद्रियाणां अध्यात्म, अधिभूत, अधिदैविक सृष्टिर्भवतिः ॥

अक्षरं ब्रह्मपरमंस्वभावोध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भव करो विसर्गः कर्म संज्ञितः ।
अधिभूतं क्षरोभावः पुरुषश्चाधिदैवतम् ॥

इंद्रिय संघट्टन संक्रमण कारिकेंत सांगितलें जाईल.

आता व्यक्त म्हणजे जगत, अव्यक्त म्हणजे प्रधान व ज्ञ म्हणजे पुरुष असें मी मागे सांगितलेंच आहे. आता या कारिकेंत तीन वस्तु कोणत्या प्रमाणांनी जाणल्या जातात तें सांगतात.

दृष्टमनुमानमाप्त वचनंच सर्वप्रमाण सिद्धत्वात् ।
त्रिविधं प्रमाणामिष्टं प्रमेय सिद्धिः प्रमाणाद्धि ॥४॥

या लोकांत जेवढी वस्तु समजते तेवढी कोणत्या तरी प्रमाणाने समजत असते. ज्याप्रमाणे धान्यादिक कुडवादिक प्रमाणाने समजते, त्याप्रमाणे जेवढे प्रमेय आहे तेवढे प्रमाणाने समजतें. ज्या साधनाने आपल्यास प्रमेय समजतात त्याला इष्टप्रमाण म्हणतात. (प्रकर्षेण माणं करोति–इति प्रमाणं) हे प्रमाण तीन प्रकारचे आहेत. दृष्ट (प्रत्यक्ष), अनुमान, आप्तवचन (शाब्द प्रमाण). बाकी शास्त्रांत जास्त प्रमाण घेतले आहेत. परंतु या तीन प्रमाणांत त्याचा अंतर्भाव होऊं शकतो. प्रमेय सिद्धि करण्याकरिता प्रमाणांची गरज असते. भाष्याप्रमाणे कारिका सांगतातः– तीन प्रकारचें प्रमाण, दृष्ट, अनुमान, आप्तवचन. दृष्ट म्हणजे इंद्रियाला जें अगदी गोचर असतें तें. कानाने शद्ब समजणें वगैरे. अनुमान म्हणजे प्रत्यक्षावरून जें केलें जातें तें. धुपटावरून अग्नीचे अनुमान. अनुमानाचें सहा भेद आहेत. पक्ष, (प्रतिज्ञा) साध्य, हेतु, उदाहरण, उपनयन, निगमन. कोणी पक्ष मिळून एकच धरतात व तेणेकरून अनुमानाचे पांच भेद मानतात. पक्ष म्हणजे साध्याचें अधिकरण. पर्वतावर अग्नि आहे. धुपटावरून सिद्ध करावयाचें आहे, येथे पक्ष पर्वत आहे. जें सिद्ध करावयाचें आहें ते साध्य. येथें अग्नि साध्य आहे. ज्याच्यावर सिद्ध करावयाचे तो पक्ष म्हणून पर्वत पक्ष झाला. ज्याच्या योगाने सिद्ध करावयाचें तो हेतु, म्हणून धुपट हेतु आहे. दुसऱ्या ठिकाणची गोष्ट सादृश्य घेणें याला म्हणतात उदाहरण. जसें स्वयंपाक घरांत धुपटावरून अग्नीचें अनुमान करावें. म्हणून स्वयंपाकघर उदाहरण. त्या उदाहरणावरून येथे धुपट आहे म्हणून येथे अग्नि असला पाहिजे. असें अनुमान काढणें याला म्हणतात उपनयन. असेंच आहे असा निश्चय करणें निगमन. अनुमानांत सहचार व व्यभिचार असे दोष असतात. त्यांत सहचार दोन प्रकारचा.

एक अन्वय सहचार व दुसरा व्यतिरेक सहचार. अन्वय सहचार म्हणजे अमुक असलें तर अमुक असणें. एकच गोष्ट पुष्कळ ठिकाणीं पाहणें जसे १०–५ ठिकाणीं आपण धुपट आहे तेथे अग्नि पाहिला. अमुक नसलें तर अमुक नसणें. याला व्यतिरेक सहचार म्हणतात. कारण सत्वे कार्य सत्वं अन्वय सहचार कारणाभावे कार्याभावः व्यतिरेक सहचार. तसाच व्यभिचार दोन प्रकारचा. अन्वय व्यभिचार व दुसरा व्यतिरेक व्यभिचार. अन्वय व्यभिचार म्हणजे कारण सत्वे कार्याभावः अमुक असलें तर अमुक नसणें. उदा० एक मनुष्य जेवणाने मेला. येथे जेवण कारण आहे. पण इतर जेवतात ते मरत नाही. येथे कार्याभाव आहे म्हणून हा अन्वय व्यभिचार झाला. व्यतिरेक व्यभिचार–कारणाभावे कार्य सत्वं–अमुक नसलें तर अमुक असणें जे जेवत नाहीत तेहि मरतात. व्यतिरेक व्यभिचाराने हेत्वाभास दोष येतो. यत्र धूमस्तत्र अग्निः हा सहचार होतो पण यत्र अग्निस्तत्र धूमः हा सव्यभिचार हेत्वाभास होतो. जेथे जेथे व्यभिचार तेथे तेथे हेत्वाभास असतोच. दुसरा एक प्रकरण हेत्वाभास आहे सहचार नियमाने अनुमान होत असतें. धुपटावरून अग्निची कल्पना. सहचारावरून व्याप्ति. व्याप्तिस्मृति अनुमानाला कारण आहे "पर्वतोवन्हिमान् धूमत्वात्" यांतहि हेत्वाभास आहे. कारण धूमत्व कोठेहि असू शकते मग पर्वतच वन्हिमान कां नाही. पर्वतोवन्हिमान्. कां तर धूमवत्वात् हें चूक कारण धूमवत्व जलावरही राहू शकते. पर्वतोवन्हिमान्. यांत अमुक पर्वताचे वन्हिमत्व सिद्ध करावयाचें असतें. पर्वताची जाति सिद्ध करावयाची नसते असे अनेक प्रकारचे हेत्वाभास होत. (हा महाराजपक्षीय हेत्वाभास होय) शाब्द म्हणजे आप्तांचा उपदेश. आप्त म्हणजे यथार्थ वक्ता. लोकांची कल्याणेच्छा ज्याला असते तो. वाक्यार्थ समजण्याला तीन कारणांची जरूरी असते. **आकांक्षाः**– म्हणजे तसाच अर्थ मनांत ग्रहीत असणें. उ० लुगडें, खांब. म्हणजे लुगडे लुगड्याला, व खांब खांबाला म्हणतात असें रूढी असणें. **योग्यताः**– बरोबर शब्द उच्चारणें. उ० अग्नीने वस्त्र भिजवून आणा असें म्हटल्यास कांही अर्थ समजणार नाही. **सान्निधः**– जवळ जवळ शब्द उच्चारणें.

चार्वाक एक प्रत्यक्षच प्रमाण मानतातः—त्याला प्रश्नः—तुझी माय विधवा आहे. बरे तुझी माय पुढे गरोदर राहिली तर गर्भावरून अनुमान करून तुझी माय कोणापाशीं निजली होती असें मानशील किंवा निजतांना प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय तुझी खात्री होणार नाही ?

**जैमिनिः**--सहा प्रमाण मानतातः—अर्थापत्तिः, संभव, अभाव, ऐतिह्य प्रतिभा, उपमान.

**१ अर्थापत्तिः**—म्हणजे कल्पना करणें. ती दोन प्रकारची:— दृष्टा व श्रुता.

**दृष्टार्थापत्तिः**—तुमच्या ठिकाणीं मीपणा असल्यास माझ्या ठिकाणीं असणें.

**श्रुतार्थापत्तिः**— देवदत्त दिवा न भुंक्ते पण लठ्ठ दिसतो म्हणून रात्रीं जेवत असावा.

**२ संभवः**—कुडवभर मावतात म्हणून पायलीभर मावतात.

**३ अभावः**—नसणें. चार प्रकारचा, (१) प्रागभाव, (२) प्रध्वंसा- (३) अन्योन्याभाव व (४) अत्यंताभाव.

(१) **प्रागभावः**—पूर्व नसणें. देवदत्त यौवनदशेंतच आहे.

(२) **प्रध्वंसाभावः**—कार्यनाशावरून कारणाच्या नाशाबद्दल कल्पना. जसें शुष्कधान्य दर्शनात् वृष्टेरभावोऽवगम्यते.

(३) **अन्योन्याभावः**—घटेपटाभावः पटेघटाभावः

(४) **अत्यंताभावः**— कोठेहि कांही उत्पन्न न होणें. उदा० खपुष्पवत्.

**४ ऐतिह्यः**—लोकांच्या म्हणण्यावरून.

**५ प्रतिभाः**—हिमालयाच्या दक्षिणेस चांगला रम्य देश आहे म्हटल्या बरोबर त्याच्या रम्यत्वाची कल्पना येणें. मनांत स्वप्न सत्य वाटणें.

**६ उपमानः**—सादृश्य.

भाष्यकार म्हणतात, अर्थापत्तिः अनुमान प्रमाणांत घेऊन बाकी शब्द प्रमाणांत घ्यावे म्हणजे तीन प्रमाणांतच यांचा अंतर्भाव करावा. भाट ६ प्रमाणें मानतो. व यांच्याच प्रमाणे कित्येकांचें मत आहे. प्रमेय सिद्धि प्रमाणाने होते. न्यायांत ४, चार्वाक १, बौद्ध २, सांख्य ३, मिमांसा ५ वेदांत भाट्ट ६ मानतात. तरी सर्व प्रमाणाने प्रमेय प्रकाशित होतें. सांख्यांत प्रमेय २५ तत्वें आहेत. वेदांताचा उत्तम सिद्धांत म्हणजे प्रमेयाच्या स्वाधीन प्रमाण सिद्धि आहे हा होय. "मानाश्रयान्मेयसिद्धिश्च युक्तः।" प्रमेय चैतन्य म्हणून प्रमेयाच्या स्वाधीन प्रमाण सिद्धि. मग वेदांतांत प्रमाण कशाला मानतात ? जडाचा विचार प्रमाणाने सिद्ध आहे. ब्रह्म प्रमाणाच्या स्वाधीन नाही.

प्रतिविषयाध्यवसायोदृष्टं त्रिविधमनुमानमाख्यातम् ।
तल्लिंगलिंगिपूर्वकमाप्त श्रुतिराप्त वचनन्तु ॥५॥

प्रमाणांचीं लक्षणें सांगतातः प्रतिविषयस्य अध्यवसायः– प्रतिविषयाध्यवसायः। प्रतिविषयाचा जो निश्चय तो प्रतिविषयाध्यवसाय. दृष्ट–प्रत्यक्ष. अनुमान तीन प्रकारचें–पूर्व कारिकेंत सांगितलें ते सामान्य आता विशेष सांगतात किंवा पूर्वी उद्देश सांगितला व आता लक्षण सांगतात. पदार्थानां नाम कथनं–उद्देश. पदार्थज्ञान होण्यास तीन साधन पाहिजें. उद्देश, लक्षण, परिक्षा. पदार्थाचें असाधारण धर्मकथन त्याला लक्षण म्हणतात. तें अतिव्याप्ति, अव्याप्ति व असंभव या तीन दोषा विरहित पाहिजें.

अलक्षे लक्षणगमनं–अतिव्याप्ति–यथा द्विश्रृंगं गोर्लक्षणंश्चेत महिष्या दपिगच्छति. लक्षैक देशत्वं–अव्याप्ति. ज्याचें लक्षण करावें त्याला लक्ष म्हणतात. काळी गाय–अव्याप्ति झाली. लक्ष्यमात्रेप्यनावृत्तित्वं असंभवः– ज्याचें लक्षण करावयाचें त्याचें ठिकाणीं तें मुळींच नसणें. जसें, एक शफत्व गाईचें लक्षण कोठेच होत नाही. दोष वगैरे काढून टाकल्यास कंठाला पोळी वगैरे धरून गाईचें लक्षण होतें. **परिक्षा**:– ज्या पदाथाचें नांव घ्यावयाचे आहे त्या पदार्थाचे ठिकाणीं तें लक्षण आहे किंवा नाही हें कोण्यातरी प्रमाणाने पाहाणें. जसे गाईचे ठिकाणीं सास्नादिमत्व आहे किंवा नाही. कोण्यातरी प्रमाणाने गोचर असलें पाहिजे तेव्हा त्याला

परिक्षा म्हणतात. मागच्या कारिकेंत भाष्यकारांनी उद्देश किंवा सामान्य लक्षण सांगून या कारिकेंत प्रमाणांचें लक्षण किंवा विशेष लक्षण सांगतात.

प्रति इंद्रियांचा विषय म्हणजे त्यांचा निश्चय होणें, त्याला प्रत्यक्ष प्रमाण म्हणतात. तो इंद्रियगोचर झाल्याने होत नाही. पण जेव्हा इंद्रियें दृष्टीने पाहून निश्चय करतात तेव्हा प्रत्यक्ष प्रमाण म्हणावें. 'भ्रम व्यावृत्ति करणाय अध्यवसायोशब्दः' तो निश्चय नाही म्हणतां येतो व प्रत्यक्ष प्रमाण होत नाही. अध्यवसाय म्हणजे निश्चय. आपल्याला नेहमीच किंवा केव्हा केव्हा भ्रमाध्यवसाय असतो तर त्याला प्रत्यक्ष प्रमाण म्हणतां येत नाही. जसें निळें आकाश हा भ्रम आहे. परंतु तो भ्रम निवृत्त होत नाही. शब्दादिक विकल्प जे आहेत ते सर्व भ्रमच. दृष्ट प्रमाण दोन प्रकारचे. **निर्विकल्पक व सविकल्पक. १ निर्विकल्पक=**दूर पदार्थ वाटणें. तुम्ही तिकडे बोलत असले आणि स्पर्श केला असें वाटणें, पण कशाचा स्पर्श झाला हे न समजणें.

२. **सविकल्पकः**– समजणें (स्पर्श.) सुखदुःखादि मानसप्रत्ययः **अनुमान तीन प्रकारचें**:– १ पूर्ववत, २ शेषवत्, ३ सामान्यतः दृष्ट. (न्यायसूत्रांत प्रत्यक्षाचें लक्षण सांगतात. इंद्रियार्थ सन्निकर्षोत्पन्नं ज्ञानं,) अथतत्पूर्वकं त्रिविधं अनुमानं.

(१) **पूर्ववत्**–कारणावरून कार्याचें अनुमान–आभाळावरून पावसाचें अनुमान. याला कारण लिंगक अनुमानादि म्हणतात.

(२) **शेषवत्ः**–कार्यावरून कारणाचें अनुमान याला कार्यलिंगक अनुमानादि म्हणतात. उदा० चिखलावरून पावसाचें अनुमान.

**सामान्यतोदृष्टः**–सामान्यतः आपल्याला कळणें. चंद्र तारका वगैरे जे कांही गोल असतील ते एका देशांतून दुसऱ्या देशांत जातात म्हणून ते गतिमान आहेत असें अनुमान करणें किंवा एका ठिकाणीं आंब्याचें झाडास बार पाहून जेथें आंब्याचें झाड तेथे त्याकाळीं बार असेल असें अनुमान करणें. भाष्यकार अनुमानाचें लक्षण करतात. अनुमान दोन प्रकारें होत असतें. एक लिंगपूर्वक, दुसरें लिंगीपूर्वक. लिंग म्हणजे चिन्ह. लिंगावरून

लिंगीचें अनुमान करणें. जसें दंड वगैरे पाहून यतीचें अनुमान करणें; किंवा लिंगीवरून लिंगाचें अनुमान करणें. यतिला पाहून त्रिंडा वगैरेचें अनुमान करणें.

आप्तश्च श्रुतिश्च–आप्तश्रुती–आप्ता ब्रह्मादयः श्रुतिश्च वेदाः–असा भाष्यकारांनी समास केला. यावरून श्रुति अनादि आहे असें ठरविलें. महाराजांचा समास–आप्तानां श्रवण विषयः–आप्तश्रुतिः–आप्तांना जें ऐकूं आलें तें. श्रुति शब्दानें श्रुतिचा विषय ग्रहण करावा. कथं श्रुतातैः–श्रुति त्यांना ईश्वराच्या जवळून ऐकूं आल्या. पातंजली सूत्रांत म्हटलें आहे, "स एव पूर्वेषां गुरुकालेनानवच्छेदात्" परमात्मा कोणत्या काळीं उत्पन्न झाल्याबद्दल कोठें दाखला नसल्यामुळें तो सर्वांचा ब्रह्मादयांचा गुरु आहे. तु शब्दानें तेंच आपल्यालाहि आप्तवचन आहे असें सांगितलें आहे. श्रुतीला अनुकूल स्मृत्यादिक तेंहि आप्तवचनच. पूर्वकारिकायाम् प्रमाणानाम् लक्षणमुक्तम् । अस्यांतु तेषां प्रयोजनमाह ।

सामान्यतस्तुदृष्टादतीद्रियाणां प्रतीतिरनुमानात् ।
तस्मादपिचासिद्धं परोक्षमाप्तागमात् सिद्धम् ॥६॥

सामान्यतः आपल्यास जें ज्ञान होतें तें दृष्टापासून होतें. याच्यामध्ये दृष्ट शब्दावरून नैय्यायिकांची जाति प्रत्यक्षावरून होते असें सांगितलें. इंद्रियाणि अतीत्यः– इंद्रियांना जें केव्हाहि गोचर होत नाही त्यांची प्रतिति अनुमानानें होते. न्यायाचें अनुमान अग्नि व धूम यांचा सहचार प्रत्यक्ष पाहून होतो. हे म्हणतात सहचार पाहावा लागत नाही. न्यायाचें अनुमान स्मृतिपूर्वक असतें. विषय अतिंद्रिय असल्यामुळें येथे प्रत्यक्षावरून अनुमान केलें जातें; म्हणून न्यायाच्या अनुमानाहून याचें अनुमान भिन्न आहे. प्रधान व पुरुष हे अतींद्रिय आहेत. म्हणून अनुमानानें साधावें लागतात. ज्ञान जरी सात्विक बुद्धीचें स्वरूप आहे तरी अनुमानानें मुक्ति होते. कशी? ज्ञानाच्या योगानें पुरुष व प्रकृतीचें ज्ञान झालें. ज्ञान दोन प्रकारचें. बाह्यांतर ज्ञान व आभ्यंतर ज्ञान (हें सात्विक प्रकृतीचे विभाग आहेत). बाह्यांतर ज्ञान म्हणजे वेदादिकांचें ज्ञान व प्रकृति पुरुषाचें ज्ञान म्हणजे आभ्यंतर ज्ञान. ज्ञान जरी सात्विक बुद्धीचा

विभाग आहे व पुरुष जरी त्रिगुणात्मक नाही तरी ज्ञानाच्या योगाने पुरुष निराळा आहे, एवढे समजते व अहंकार निवृत्त होऊन मुक्ति होते. प्रधान पुरुष हें नेहमीच अनुमानानें साधावें लागतात. कोणत्या अनुमानानें समजतात ? सामान्यतो दृष्ट अनुमानाने समजतात. महदादिक जे कार्य व्यक्त आहें तें त्रिगुणात्मक आहे म्हणून कारण त्रिगुणात्मक असलें पाहिजें. कारण गुणच कार्यांत असतात. मातीचे जडत्वादिक गुण घटांत असतात. म्हणून प्रधान त्रिगुणात्मक. वास्तविक अचेतनपण चेतनाप्रमाणे भासतें. चेतन ज्ञान हा धर्म बुद्धीचा. इंद्रिय वगैरे जड आहेत. "इवा भातीति भ्रममाह" शरीर आत्मा नसून आत्मा आहे असें आपल्याला भासतें तें कां ? मी कर्ता भोक्ता असें भासणें. खरोखर प्रकृतीचा धर्म आहे पण हा धर्म आपल्यावर ओढून घेतो. "अचेतनंचेतनमिवाभाति" ज्ञान धर्म चेतनाचा. हा चेतन आत्मा आहे. असें सूत्रांत सिद्ध केलें आहे. "अस्ति आत्मा" (१) स्पष्टीकरण सांगतात:—अहंजानामि, अशा प्रकारचें सामान्यत: सिद्ध ज्ञान असतें. मी आपल्याला जाणत नाही असें कधी होत नाही, म्हणून हा आत्मा सामान्यत: सिद्ध आहे. पण **विवेकाने समजावा** लागतो. बुद्धीचा धर्मंहि चेतन सांगितला आहे. तर मग तोच आत्मा की काय ? बुद्धीच्या ज्ञानाला आपण जाणतो म्हणून जाणगेंपणाचें ज्ञान तें चैतन्याचें ज्ञान होय. बुद्धीचें ज्ञान जड असून (मोक्षापर्यंत हें ज्ञान प्रकृति वगैरे सत्य) मोक्षाचें ठिकाणीं याला खोटें वाटतें व इतराला सत्य म्हणून हें ज्ञान बाधक असा या शास्त्राचा सिद्धांत आहे म्हणून भ्रम होऊं देऊं नये. तो आत्मा देहादिकापासून निराळा. देहादिक जड म्हणून माझे हें शरीर माझी बुद्धी असें म्हणतो. अभेद अर्थाचें ठिकाणीं षष्ठी उत्पन्न होत नाही. अभेदाचें ठिकाणीं प्रथमा. अशा प्रकाराने पुरुषाचें ज्ञान होतें. भाष्यकार म्हणतात, देह आपल्याला जड चेतन वाटतो हा भ्रम आहे. भ्रम जरी आहे तरी अधिष्ठानावाचून होत नाही. देहाचें ठिकाणीं अहंबुद्धि बाधक. एकाच ठिकाणीं दोन विरोधी वस्तु राहात नाही. असल्यास कोणती तरी मिथ्या असलीच पाहिजे. आपल्या देहाचें ठिकाणीं दोन प्रकारच्या बुद्धि आहेत. कोणी हाका मारल्यास "मी आहे" असें अहंताज्ञान होतें व पोट दुखल्यास माझें पोट दुखतें इत्यादि ममताज्ञान होतें.

अहंताज्ञान अभेदाचें ठिकाणीं होतें व ममताज्ञान भेदाचें ठिकाणीं होतें. या दोन्ही वृत्ती एकाच ठिकाणीं बरोबर नाही; कोणती तरी मिथ्या असली पाहिजे. तत्त्वज्ञानांचें ठिकाणीं जें ज्ञान आहे तें मिथ्या नाही. मी देह आहे असें ज्ञान तत्वज्ञानाचें ठिकाणीं नसतें. पण माझे आहे असें ज्ञान त्यांचें पाशीं असतें. अहंताज्ञान (प्रथमा भ्रम) मिथ्या. आता भाष्याची व याची संगति. देहादिक जड असून चेतनासारखे भासतात हा भ्रम. भ्रमाविषयी पांच ख्याति निर्दिष्ट आहेत त्या पदार्थोद्देशदीपिकेंत पाहाव्या. ख्याति म्हणजे तसें वाटणें, प्रतीति. न्याय भ्रमाविषयी अन्यथा ख्याति मानतात. अन्यरूपें करून अन्य वस्तुचें भान याला अन्यथाख्याति म्हणतात. जसें जपाकुसुम. सांख्य अख्याति मानतात:– अख्याति म्हणजे सामान्यत: ज्ञान असून त्याची स्मृति होऊन भ्रमाने विशेष प्रतीति होणें. जसें रज्जुवर सर्प आहे तेव्हा सर्पाची स्मृति होऊन म्हणजे सामान्यत: रज्जु माहित असतो व सर्पाची स्मृति होते म्हणजे रज्जूचे दीर्घत्वादि धर्म माहित असतात व सर्पाची स्मृति होते व भ्रम होतो. असें सांख्य मानतात पण रज्जूचें सामान्यज्ञान आणि पूर्वदृष्ट सर्पाची स्मृति दोन्ही अंत:करणांत एकसमयावच्छेदेंकरून होणें संभवनीय नाही, आणि सर्प रज्जुवर जर प्रत्यक्ष दिसणार नाही, तर त्यापासून भयादिक होणार नाहीत व सर्पभानकालीं सर्पज्ञानच असतें. दोन ज्ञानें नसतात, म्हणून आख्याति मानणें असंगत आहे. येथे भाष्यकारांनी नैय्यायिकांचे ख्यातिचा स्वीकार केला आहे. " यतश्चाचेतनं चेतनमिव आभाति." येथे आख्याति मानली नाही. मानल्यास चेतनाची स्मृति व जडाचें सामान्यज्ञान मानावें लागेल व जडच अधिष्ठान मानावें लागेल. चेतनाची स्मृति आल्यास विवेक होईल. अविवेक राहणार नाही. देहादिक जड असून चेतन संन्निकृष्ट असल्यामुळे चेतन भासतात. सांख्यानें अन्यथाख्याति स्वीकारली नाही तरी अन्यथाख्याति मानावी. परमात्म्याचा कारणपणा देशकालामध्ये प्रतीत होतो. या ठिकाणीं वेदांतांतहि अन्यथा-ख्यातिच मानली आहे. जपाकुसुमाच्या स्फटिकाला लालपणा जो येतो त्याला वेदांत परिभाषेंत अन्यथाख्यातिच मानली आहे. जसें जपाकुसुमा-प्रमाणें भासतें तसें जड देहादिक चेतन भासतात. देहादिक अचेतन असून

चेतन भासतात व हें अधिष्ठानावाचून होत नाही. बौद्ध अधिष्ठानावाचून मानतात. मग सशाचें शिंग दिसावें पण स्वप्नांत देखील दिसत नाही. अधिष्ठानाशिवाय भ्रम होत नाही. या ठिकाणीं भ्रम भासतो म्हणून चेतन अधिष्ठाता आहे तो पुरुष आहे असें अनुमानाने सिद्ध होतें. अधिष्ठान जपाकुसुम ज्याच्या ज्ञानानें भ्रमनिवृत्ति होते तें अधिष्ठान. अधिष्ठाता दुसऱ्या ठिकाणीं भ्रम उत्पन्न करितो. याप्रमाणे प्रकृति पुरुष अतींद्रिय असून अनुमानाने ज्ञान होतें. व्यक्त प्रत्यक्षाने सिद्ध आहे.

पंचतन्मात्रा, पंचमहाभूतें हें इंद्रिय गोचर आहे आणि इंद्रिय व अहंकार मनाला प्रत्यक्ष आहे. आणि बुद्धि ही पुरुषाच्या साह्यानें साक्षी-भास्य आहे. आपल्याला ज्ञानाने बुद्धि आहे म्हणून कळते. साक्षीच्या साह्यानें सात्विक वृत्तीला बुद्धि प्रत्यक्ष आहे प्रकृति पुरुष नित्य अनुमेय. तरी समाधीदशेंत पुरुष अपरोक्ष होतो आणि अज्ञान केव्हाच प्रत्यक्ष होत नाही. म्हणून नित्य अनुमेय. शंकराचार्यांनी इला कार्यानुमेय म्हटलें आहे. व्यवहार दशेंत प्रकृति पुरुष दोन्हीहि अनुमेय. प्रत्यक्षाने समजत नाही व अनुमानाने समजत नाही ते आप्तवचनाने समजावें. स्वर्गांत अप्सरा वगैरे आप्तवचनानें समजतें.

सांख्यांत प्रधान पुरुष अनुमान गोचर मानतात. दुसरे वेदापेक्षाहि पुरुषाचें ज्ञान आभ्यंतर मानलें आहे व अनुमानाने होतें म्हणून अनुमान वेदापेक्षा श्रेष्ठ असा सांख्याचा निःष्कर्ष दिसतो. वेदांतांत अनुमान हें दुर्बल मानलें असून श्रुतिवचनानेंच आत्मनिर्णय होतो, असें वेदांतांत मानतात. हेंहि बरोबर आहे. अनुमानाने सामान्य कळतें. घटावरून कुंभा-रानें हा घट केला असें अनुमानाने कळेल; पण अमुकच कुंभारानें केला असें कळूं शकत नाही. येथे आप्तप्रमाण आहे. चेतन पुरुष आहे असें अनुमानाने कळेल पण पुरुष अकर्ता, मुक्त वगैरे हे श्रुति वचनावरूनच कळतें. म्हणून दोन्ही मतांची एकवाक्यता आहे किंवा हें अनुमान मनन दशेंत लावून वेदान्ताचे शब्द बलवज्ज्ञान श्रवणदशेंत घ्यावें. "श्रवणंगुरु-शास्त्राभ्यांमननंच स्वयुक्तिभिः" सांख्याचें अनुमान युक्तींत घेतल्यामुळे मननांत घ्यावें. "श्रोतव्यं श्रुतिवाक्येभ्यः मंतव्यंचोपपत्तिभिः" । सांख्याचें

अनुमान विवेकाला उपयोगी पडते. मत्वाच सततं ध्येयं । एते दर्शन हेतवः। मनन केल्या तर पुरुषाचा साक्षात्कार होतो. म्हणजे पुरुष अपरोक्ष होतो याप्रमाणे वेदांताची व सांख्याची एकवाक्यता. योगसूत्रांत बुद्धीचा साक्षात्कार होतो. योगाने बुद्धि प्रत्यक्ष होते. "ज्योतिष्मति प्रवृत्ति।"

---

अतिदूरात्सामीप्यादिंद्रियघातान्मनोऽनवस्थानात् ।
सौक्ष्म्याद्व्यवधानादभिभवात्समानाभिहारच्च ॥ ७ ॥
सौक्ष्म्यात्तदनुपलब्धिर्नाभावात्कार्यतस्तदुपलब्धिः ।
महदादितच्च कार्यं प्रकृति विरूपं सरूपं च ॥ ८ ॥

काल अनुमानाच्या योगाने प्रधान पुरुषाचें ज्ञान होतें असें सांगितलें. पूर्वपक्षः– प्रधान पुरुष दिसत नाही म्हणजे उपलब्धि होत नाही. जें जें उपलब्ध होत नाही, तें तें नाहीच. वेदान्ती प्रधान पुरुष नित्य अनुमेय मानतात. नित्य अनुमान जर करावयाचें तर नाहीच म्हणावयाचें. उपलब्धि प्रमाणाने नसल्यामुळे अनुपलब्धि प्रमाणाने मानणारे कांही भाट्ट आहेत. भाट्ट साहा प्रमाण मानतात. त्यांत अनुपलब्धि प्रमाण जें उपलब्ध नाही तें किंवा चार्वाक येथे शंका करतो म्हणा किंवा भाट्टच शंका करतो म्हणा कारण शब्दाने मिळणारे स्वर्गादि यांच्यावर त्यांची टिका नाही.

**उत्तरः**–हें जे तूं सांगतोस हें बरोबर नाही. कारण वस्तु असून न दिसण्याला ८ प्रतिबंध आहेत. यावरून कोणती वस्तु नाही असें नाही. "चकारेण न भवति उपलब्धिः इत्यर्थः अतिदूरात्–इंद्रिय गोचरत्वेन अतिदूर वर्तते. सामिप्यात् समीपस्य भावः। इंद्रियस्य घातः छेदः। न अवस्थानं मनसः अनवस्थानं। सूक्ष्मस्य भावः सौक्ष्यम्, अवस्थान–स्थिरता. विगतं अवधानं यस्मात्–अवधानं–इंद्रिय द्वारा वृत्ति निर्गमनं। अभिभवात्। समान अभिहारं–ग्रहणं।

**आठ कारणें.** १ वस्तु असून अति दूर असली तर दिसत नाही. जसें हिमालयावर असलेला कलाप ग्राम दिसत नाही. म्हणून नाही असें नाही. २ अतिशय जवळ असलेली वस्तु दिसत नाही. जसें डोळ्यांतील

काजळ. अंजनावरून किरण उलटून येत नाही की काय ? डोळ्यापासून ६ इंचावर असणारा पदार्थ दिसतो. ३ इंद्रियाचा एखादा छेद झाला असला तर आंधळ्यास दिसत नाही. ४ मन एकाग्र नसल्यास वस्तु असून दिसत नाही. एखाद्याने कांही सांगितल्यास कांही समजत नाही. या ठिकाणीं जडवादी भलतेंच बोलतात. ते म्हणतात मेंदूने ज्ञान होतें. पदार्थाचे तरंग पहिले उठून आपल्या इंद्रियावर आघात होतो व तो आघात त्या ज्ञानतंतूच्या द्वाराने मेंदूंत जाऊन त्याचे ठसे पडतात व ते ठसे आपल्याला समजतात. या ठिकाणीं जेवढें ज्ञान होतें तेवढें बाहेरच्या पदार्थांच्या आघातामुळे होतें, असें मानतात. एकाग्रता (Attention) ते मानतात. व ही एकाग्रता कांही बाहेरून येत नाही. आपलें चित्त एकाग्र नसतें, त्यावेळेस पदार्थ दिसत नाही. पदार्थाचे आघात तर होऊन जातात. म्हणून मेंदूहून दुसरे असल्याशिवाय त्या ठश्याचें ज्ञान होत नाही हें सिद्ध आहे. या एकाग्रतेवर (Attention) पारकीय मानसशास्त्री (Psychologists) कांहीतरी उत्तर देतात. ते म्हणतात त्यावेळीं आमच्या मेंदूचे परमाणू दुसरीकडे गेले असतील म्हणजे डोक्याचा भाग किंवा डोळयाचा भाग मागे गेला होता की काय ? हा दोष टाळण्याकरिता आमच्या मेंदूची शक्ति दुसरीकडे होती असें म्हणतात म्हणजे मेंदूहून शक्ति निराळी मानल्यास इष्टापत्ति. कोणी म्हणतात हे मेंदू बापाच्या मेंदूप्रमाणे झालेले आहेत. मन बापाच्या मनाप्रमाणे झालें. यामुळे डोळ्याचा भाग किंवा डोक्याचा भाग पाठिमागे गेला नाही. मेंदूला सोडून मन राहात नाही. जेम्सने (James) आपल्या सायकॉलॉजी (Principles of Psychology) मध्ये जडवाद्यांच्या मताप्रमाणे लिहून शरीराहून मन निराळें मानून सर्व खोडून काढलें आहे व टेलीपॅथी शोधून काढली. कांही विजेवर त्यांचें (एकाग्रतेचें) उत्तर देतात. विद्युच्छक्तीप्रमाणे मन आहे असें मानतात. विद्युच्छक्तीस ज्ञान होतें की काय ? ज्ञान मानल्यास ज्ञानमय शक्ति आहे असा आमचा पक्ष सिद्ध आहे. दुसरें विद्युच्छक्तीला बुद्धिमान मानावी लागेल व न मानल्यास कार्य घडवून आणण्यास कोणीतरी दुसरी शक्ति पाहिजे,

म्हणून विद्युत् जड आहे. Alexandar James ने "जीवितांची व मनाची गणिताने उत्पत्ति" नांवाच्या पुस्तकांत एकाग्रतेचें उत्तर विद्युत्-शक्तीच्या योगाने देण्याची खटपट केली आहे. विद्युत् बुद्धिमान नसल्यामुळे हें बरोबर नाही. व एखादे वेळेस आपण म्हणतो माझें इकडे लक्ष नव्हतें. जसा पदार्थ असेल तसे संस्कार व्हावे पण हा अमुकच पदार्थ आहे असें ज्ञान करून देणें संस्कारांत नाही. विद्युतमध्ये ही शक्ति नाही. ही नुसती धारकशक्ति आहे. विद्युत बुद्धिमान मानल्यास जडापासून तिची उत्पत्ति मानतां येणार नाही. मग भिंतींतून आगगाडी उत्पन्न केल्यासारखें होईल. जड चैतन्याचा विरोध मानल्यास एकापासून दुसरें उत्पन्न होऊं शकत नाही. हे संस्कार पूर्वपरंपरेने होत आले तरी त्यांच्यापासून हा पदार्थ अमुकच आहे असें जाणले जाणार नाही. हजारो वर्षें जरी संस्कार होत गेलेत तथापि हा संस्कार हा नव्हे असें ज्ञान चेतन शक्तिशिवाय होऊं शकत नाही. Spencer हा जडवादी आहे, पण निःपक्षपाति असल्यामुळे कांही तरी चेतनशक्ति आहे असें कबूल केलें.

---

## पारकीय लोक निरीक्षण

रानटी मनास थोडें ज्ञान प्राप्त झाल्याबरोबर अभिमान प्राप्त होतो. त्यांना राज्याच्या स्वातंत्र्यामुळे थोडें वैराग्याशिवाय थोडें ज्ञान झाल्यामुळे तेवढयाच ज्ञानाने ते फुगून गेले आहेत. कलाकौशल्याचा अभिमान आहे. चढाओढीची महत्वाकांक्षा त्यांच्यांत आहे. व्यक्तिस्वातंत्र्य स्त्रीप्राबल्य, प्रत्येकांची चैन करण्याकडे प्रवृत्ति असल्यामुळे आध्यात्माकडे प्रवृत्ति होत नाही. राजपक्षाची व प्रजापक्षाची ओढाताण असल्यामुळे बापापोरामध्ये वगैरे ओढाताण होते. त्यांना परलोकांची कल्पना दृढ नाही. असा नास्तिकपणा वाढल्यामुळे आपआपसांत ओढाताण फारच वाढत जाते. वर प्रमाणे पारकीय मत खंडन केलें.

५ **सौक्ष्म्यात्**–फारच सूक्ष्म असल्यामुळे. धूम व पाण्याची वाफ परमाणू असून गगनांत गेल्यावर दिसत नाही.

६ **व्यवधानः**–प्रतिबंध–भिंतीपलीकडील वस्तु दिसत नाही.

७ एखादी वस्तु दुसऱ्या वस्तुच्या प्रभावांत दडपून गेल्यास दिसत नाही. ज्याप्रमाणे सूर्य प्रकाशांत नक्षत्र. **समानाभिहार**–सारखेपणामुळे.

आठहि प्रतिबंध निवृत्त झाल्यावर वस्तु नाही म्हणावयाची. अभावाचा स्वीकार सांख्यहि करतात. ते कार्य सत्य मानतात. प्रधान पुरुष कोणत्या प्रतिबंधामुळ दिसत नाही ? सूक्ष्म असल्यामुळे त्याची उपलब्धि दिसत नाही. (सौक्ष्म्यात्, उपलभ्यते–इति उपलब्धिः– भूतसत्तायां–सत्ता एवभावः न निश्चयार्थकमव्ययम्) (कार्यामुळे उपलब्धि आहे.) प्रधानाची उपलब्धि कार्यामुळे आहे. जसें रामकृष्णादि गोप म्हटल्याने रामकृष्ण ज्या गोपामध्ये आहेत असा भाव होतो. हा तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि होतो. त्याप्रमाणे कार्याच्या गुणावरून प्रधानाची अनुमानाने उपलब्धि आहे. विरूप–विसदृश. सरूप–सदृश.

भाष्य सांगतात:–प्रधान पुरुषाची उपलब्धि सूक्ष्मत्वामुळे होत नाही. अभावामुळे अनुपलब्धि नाही. अभावामुळे असतें तर कार्य दिसलें नसतें. कारण अभावापासून कांही उत्पन्न होत नाही. यद्यपि नैय्यायिक प्रागभावापासून कार्य मानतात तरी प्रागभावाचीं उत्पत्ति मानत नाहीत. कार्य झाल्यावर प्रागभाव नष्ट होतो असें मानतात. प्रतियोगी मानतात. प्रधानाचें कार्य दिसतें म्हणून उपलब्धि आहे. "कार्यानुमेया सुधियैव माया"—" असे विवेक चूडामणींत श्री शंकराचार्यांनी म्हटलें आहे. कार्य कोणतें–महदादि, बुद्धि, अहंकार, तन्मात्रा इत्यादि. याप्रमाणे २३ तत्वें कार्य आहेत. घटादिक सर्ग आहेत. कशावरून कार्य म्हणतां ? कार्य कारणाचा नियम आहे की, जें ज्याच्यापासून होतें तें त्याच्या कांही तुल्य असतें व कांही अतुल्य असतें. बापापासून मुलगा व पाण्यापासून गार. किंवा मातीपासून घट. काठिण्य समान आहे. कंबुग्रीवादिक धर्म विसदृश. याप्रमाणे महदादिकांचें ठिकाणीं प्रधानाचें जडत्व व त्रिगुणत्व सारखें व अनित्यादि धर्म सारखें नाही. महदादिक सृष्टिदशेंत नाहीसे होतात. "प्रकृतिं पुरुषं चैव विद्धयनादि उभावपि" अशाप्रकारें प्रधानाची उपलब्धि आहे.

असदकरणादुपादानग्रहणात्सर्वसंभवाभावात् ॥
शक्तस्य शक्य करणात् कारणभावाच्चसत्कार्यम् ॥ ९॥

या कारिकेंत कार्य सत् आहे असें सांगतात. कारण द्विविधं । साधारण-मसाधारणंच । कार्यापूर्वी जें असतें तें कारण. तें नियत असलें पाहिजें. तें अनन्यथा सिद्ध पाहिजें. घटाला गधेमाती आणतात म्हणून घटाचें कारण गधे नव्हे. साधारण कारण=सर्वेषां कार्याणां एकं कारणं-सर्व कार्याला एकच कारण–सर्व धान्यास पाऊस हें साधारण अधार आहे कारण.साणर कारण–एकस्यैव कार्यस्य एकैव कारणं–तांदुळाला तांदुळाचाच दाणा उपयोगी पडतो. असाधारण कारण याला करण म्हणतात. जें न करणें तें अकरण. असत् च अकरणं च–तस्मात्. आदानं–ग्रहणं. नित्य कार्य ज्याच्या समीप राहतें त्यास उपादान म्हणतात. सर्वत्र ठिकाणीं उत्पत्ति त्याला सर्वसंभव म्हणतात. शक्तस्य–शक्तिमान.

महदादिक जें कार्य सांगितलें तें सत् आहे की असत् आहे ? कारिका अधिकरणरूप आहे. संशयांत दोन पक्ष असतात. पूर्वपक्ष व उत्तर पक्ष बौद्ध कार्य असत् मानतात. चार्वाक सत् मानतात. सत् असतें तें असत् होत नाही व असत् असतें तें सत् होत नाही. भगवान म्हणतात, "नासतो विद्यते भावोनाभावो विद्यते"–असत् पक्षाचा सत् पक्ष व सत् पक्षाचा असत् पक्ष होतो. तो कांही वस्तूला अवलंबून होत नाही. खऱ्याचें खोटें व खोटयाचें खरें असा न्याय, ही गोष्ट खरी आहे किंवा खोटी आहे हें न समजल्यामुळे होतें. न समजणें हा एक प्रतिबंध आहे, किंवा अकौशल्यादि प्रतिबंधामुळे असें होतें. यावरून एखादी गोष्ट जरी न्यायाच्या दृष्टीने खऱ्याची खोटी केली तरी न्याय सत्कार्य-वादी असल्यामुळे विपर्याय होत नाही. बौद्ध कार्य असत् आहे असें म्हणतात. बौद्ध चमत्कारिक आहेत. भागवतांत भगवान बुद्ध विष्णूचा अवतार सांगितला आहे. बौद्ध त्याला अवतार मानीत नाहीत. या दृष्टीनें आपण बुद्धाला जास्त मान देतो. बुद्धाविषयी बुद्धागमाचें ठिकाणीं ज्यांना श्रुतिपथाचा अधिकार नाही, त्यांनी बौद्ध धर्मांत जाऊन कल्याण करून घ्यावें असें स्कंध पुराणांत सांगितलें आहे. "यं शैवासमुपासते शिव इति ब्रह्मेति वेदांतिनो––" इत्यादि उक्ती आहेत. जयदेव स्वामी म्हणतात, "निंदसियज्ञविधे––" हे केशव तूं बुद्ध शरीर धारण करणारा

आहेस. पुन: सदयहृदय आहेस. म्हणजे तुला हृदय (विद्वान) हि आहे, व सदयहि आहेस. यज्ञविधीची कर्मकांडाची निंदा करतोस. वेद देखील पशुघात सांगतो असें मोठ्या कष्टाने उद्गार काढतोस. याप्रमाणे जयदेव स्वामी बुद्धाला मानतात. स्वामी विवेकानंद म्हणतात. बुद्ध लोकांना करुणेने ज्ञान सांगू लागला. त्यांनी म्हटलें मी कांही नवीन सांगीत नाही. ब्राह्मणांनी सांगूनच ठेविलें आहे. दीनाकरिता मी प्राकृतांत सांगतो. पाली भाषेंतील "धम्मपद" नांवाचा ग्रंथ बुद्धाचा स्वतंत्र ग्रंथ आहे. स्वत: बुद्धांनी केलेला आहे. त्यांत उत्तम प्रकारची नीति सांगितली आहे. वेदांतासारखा तोच बुद्धाचा स्वतंत्र ग्रंथ आहे. इतर बुद्धाचें वाक्य घेऊन रचलेले ग्रंथ आहेत. एका व्याख्यानांत (Web of Indian life) निवेदिता बाई स्वामी विवेकानंदाच्या वाक्यावरून म्हणते, बौद्ध धर्मांत दया फार आहे व ब्राह्मण धर्मांत ज्ञान फार आहे. शंकराचार्यांनी बुद्धांनी केलेला अमरकोश बुडविला नाही. भागवतांत त्याला सदय म्हटलें आहे. यावरून आपल्या लोकांचें बुद्धाविषयी चांगलें मत आहे.

या बुद्धांनी जगाविषयी चार भावना सांगितल्या आहेत. (१) सर्वं क्षणिकं क्षणिकं (२) दु:खं दु:खं (३) सर्वं स्वलक्षणं स्वलक्षणं (४) सर्वं शून्यं शून्यं. परंतु योगवासिष्ठांत वसिष्ठ सांगतात, ज्याला आम्ही ब्रह्म म्हणतो त्याला बुद्ध शून्य म्हणतात. राम म्हणतो मी आपल्या आत्म्याचें ठिकाणीं असा शांत झालो पाहिजे जसा बुद्ध शून्याचें ठिकाणीं शांत झाला. स्वामी विद्यारण्य म्हणतात:– "यद्यपि भगवान बुद्ध एक एव बोधयिता" सूर्य लयाला गेला असें वाक्य ऐकून चोर जसे चोरीचा यत्न करतात, त्याप्रमाणे भगवान बुद्धांनी ब्रह्मच सांगितलें असून शिष्यांनी चार भावनांचा भलताच अर्थ केला. दुसरें भागवतांत असें सांगितलें आहे की, भगवान बुद्ध सुरद्वेषीयांना मोह पाडण्याकरिता उत्पन्न झाले होते. यावरून त्यांच्या मनांतील विप्रलिप्सा असुराकरिता असेल किंवा त्यांच्या दयेचा परिणाम विप्रलिप्सेसारखा झाला असावा. ज्ञानेश्वर महाराजांनी बौद्धांच्या आचारावर टीका केली आहे. मानसिक अहिंसेवर टीका केली नाही, म्हणजे मानसिक अहिंसेचा निषेध केला नाही. असें नसतें तर

बुद्धांचा दृष्टांत योगवासिष्ठांत घेतला नसता. ती अहिंसा आपल्या कामाची नाही. क्षत्रियांच्या वगैरे कामाची नाही. दयेमुळे अशौच वगैरे फार वाढते. एका कवीने म्हटलें आहे, "सत्यं म्लेंच्छे दया जैने भक्ति-र्भागवतेजनें ॥ त्रयोऽपिनरकंयान्ति हिंसा·····॥" म्हणून ब्राह्मण धर्मांतील ज्ञान, यांच्या धर्मांतील सत्य घ्यावें. श्री शंकराचार्यांनी बौद्धांचें खंडण केलें, बुद्धाचें खंडण केलें नाही. असे नसतें तर संकल्पांतून बौद्धावतारे हें पद काढून टाकलें असतें. हे बौद्ध तीन प्रकारचे आहेत. (१) सर्वास्तिक्यवादी–यांना सौत्रांतिक म्हणतात. (२) शून्यवादी–यांना माध्यमिक म्हणतात. (३) विज्ञानवादी–यांना योगाचार बौद्ध म्हणतात. **सर्वास्तिक्यवादी** हे सर्व जगत् आहे म्हणतात व बाकी कांही नाही. **शून्यवादी** हे सर्वच शून्य आहे म्हणतात. **विज्ञानवादी** मनोमय सृष्टि मानतात. **समुदाय** दोन प्रकारचा--भूतभौतिक व स्कंद. **भूतभौतिक** म्हणजे पंचमहाभूत यांच्यापासून झालेला. अंतः– सृष्टींत पांच स्कंद मानतात:– १. रूप, २. विज्ञान, ३. वेदना, ४. संज्ञा, ५. संस्कार. १. **रूप**–म्हणजे आकार वगैरे. २. **विज्ञान** दोन प्रकारचें–आलय व प्रवृत्ति. **आलय** म्हणजे मी पणा–मी मी आहे असें वाटणें. **प्रवृत्तिः**–एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणें. ३. **वेदना**–सुखदुःखाचें ज्ञान. ४. **संज्ञा** शब्दज्ञान. ५ **संस्कार** बाहेरचें ज्ञान ज्या रीतीने होते, त्याला म्हणतात. क्षणिकत्व सर्व मानतात. क्षणिक म्हणजे विजेप्रमाणे. पूर्व नाश व उत्तर उत्पन्न होत जातो. विज्ञानवादी बाहेरची भूतभौतिक सृष्टि मानत नाहीत. स्वप्नासारखें बाहेरचें जगत आहे असें मानतात व आलय विज्ञानाला आत्मा म्हणतात. शून्यवादी–विज्ञानहि नाही म्हणजे अंतःसमुदायहि नाही व बाहेरचा समुदाय नाही. सर्व भ्रम आहे असें मानतात.

(१) सर्वास्तिक्यवाद्यांचें खंडण विज्ञानवादाने होतें. विज्ञानवादी स्वप्नामध्ये सर्व कांही होतें व बाहेर सर्व क्षणिक मानतात म्हणजे प्रतिक्षणि नवीनच उत्पन्न होतें असें मानतात. तर मी जो बालपणीं होतो, आता तरुणपणीं आहे अशी स्मृति होऊं नये. यामुळे क्षणिकत्व नष्ट. यद्यपि दृष्टिसृष्टिवादाने क्षणिक वाद स्वीकारला आहे तथापि

अविद्येविषयी स्वीकारला नाही. चित्त, अविद्या यावज्ज्ञान अनादि मानतात. दृष्टिसृष्टिवादांत क्षणिकवाद स्थूल सृष्टिबद्दल स्वीकारला आहे. पण क्षणिकत्व मनावर अवलंबून आहे असें सांगितलें व संकल्पाच्या कालाचा क्षय झाला म्हणजे क्षणिकत्व असें मानतात. आत्मज्ञानाने संकल्पाचा क्षय म्हणजे संकल्पाची वस्तु राहूं शकत नाही. ईश्वराने संकल्प केला की, ही सृष्टि प्रलयापर्यंत राहावी म्हणून प्रलयापर्यंत राहते. दृष्टिसृष्टिवादांत जरी क्षणिकत्व आहे तरी यावज्ज्ञान चित्तांतून बीजरूपाने सृष्टि निघत असतें. स्थूल सृष्टि उत्पन्न झाल्यावर क्षणिकपणा व तोहि मनावर अवलंबून. शून्यवादी जगत हें शून्यावर भ्रांति आहे असें म्हणतात. अधिष्ठानावरच भ्रांति होत नसते. आकाशाच्या ठिकाणीं कांही नसूनहि नीलत्व दिसतें तें दुसऱ्या आकाशावर भ्रांति आहे. घरांतल्या आकाशावर भ्रांति दिसत नाही. शून्यावर हें जगत भ्रांति आहे म्हणतां तर ही भ्रांति कांही नाही. कांही नाही हें देखील कोणी असल्याशिवाय म्हणतां येत नाही.

शून्य सिद्धांत बोधु । कोणे सत्ता होये सिद्धु ।
नसता हा अपवादु । वस्तूसि जो ।। अमृतानुभव ।। ४।२७
घटु घटपणें भासे । तद्भंगे भंगू आभासे ।
सर्वथा नाही तै नसे । कोणें म्हणावें ।।अमृतानुभव ।। ४।३०

सारांश भ्रांति शून्यावर होत नाही.

माध्यमिक खंडण सांगतात. हे बाहेरची सृष्टि मानत नाहीत. जसा राजा आपलें वैभव वाढवून दुसऱ्या शत्रूवर दाब पाडतो, त्याप्रमाणे ही कारिका आपल्या मतास पुष्टि व बौद्धास निषेध वाक्य आहे. कार्य हें खरें होण्यास योग्य आहे. हेतुपंचकात् यद्यदहेतुपंचकवत्तत्तत् सत् जगतवत् **पांच हेतु कोणते**:– एकैकेन हेतुना कार्यं सत् भवितुमर्हति तदा किं पंचभिर्हेतुभिः । सत् कार्यमस्ति–असदकरणात्. यद्यद् असद करणं तत्तत् सत्भवितुमर्हति–घटादिवत्. जे जे असद करण (सत् कारण) नें तें सत् होण्यास योग्य आहे. घटादिवत्. शशशृंगादिकापासून घट उत्पन्न होत नाही. दंडादिक जे खरीं साधनें आहेत, त्यांच्याच योगाने घट उत्पन्न होऊं शकतो. इतश्चकार्यंसत् भवितुमर्हति–उपादान ग्रहणात्. यद्यद् उपादान ग्रहणं तत्तत् सत्–तैलादिवत्. भलत्याच उपादानापासून भलतेंच कार्य

उत्पन्न होऊं शकत नाही. वाळूपासून तेल उत्पन्न होत नाही. इतश्च कार्यंसत्भवितुमर्हेति– सर्व संभवाभावात्. यस्य यस्य सर्व संभवाभाव: तत्तत् सत्–मनुष्यादिवत्. मनुष्यापासून मनुष्य उत्पन्न होतो. लाकडापासून होत नाही. अमीबाला कोणीकडूनहि अवयव उत्पन्न होतात, तरी येथे संभवाभाव आहे. कारण त्या प्राण्याला अमुकच अवयव अमुकच ठिकाणाहून उत्पन्न करिता येत नाही. इतश्च कार्यंसत्भवितुमर्हेति–शक्तस्य शक्य करणात्. यद्यद्‌शक्तस्य शक्य करणं तत्तत् सत्–घटादिवत्. चक्रावरच घट होतो. नखावर होत नाही. ज्यांनी जो पदार्थ व्हावयाचा असला त्यांनीच तो होतो. इतश्च कार्यंसत्भवितुमर्हेति–कारण भावात्–यद्यद् कारणभाव: तत्तत् सत्–चकार हेतु समुच्चययार्थक–वृक्षादिवत्. अकारणापासून कांही उत्पन्न होत नाही. नाहीतर सोन्यापासून लाकडें उत्पन्न झालीं असती.

---

## विशेष व्याख्यान

कार्य असत् होण्यास योग्य म्हणतात. त्यांना प्रश्न. (माध्यमिकांना) अभाव चार प्रकारचा. १. प्रागभाव, २. प्रध्वंसाभाव, ३. अनोन्याभाव, ४. अत्यंताभाव.

१. **प्रागभाव**:–कार्याच्या पूर्वी नसणें. २. **प्रध्वंसाभावः**–कार्याचा नाश झाल्यावर कारण नाहीसें वाटणें. ३. **अन्योन्याभाव**:–घटेपटाभाव:, पटे घटाभाव: ४. **अत्यंताभावः**–कोठेच न उत्पन्न होणें. एखाद्या वस्तुचा अभाव. यापैकी कोणत्या अभावापासून कार्योत्पत्ति मानतोस ? **प्रागभावा**पासून मानल्यास कार्योत्पत्तीच होणार नाही. **प्रध्वंसाभावा**पासून मानल्यास बीजाच्या नाशापासून वृक्ष मानल्याप्रमाणे होईल. **अन्योन्याभाव** मानल्यास कोठेहि कांही उत्पन्न व्हावें. **अत्यंताभाव** मानल्यास शशश्रृंग वगैरे उत्पन्न झाले पाहिजे. कारण खरें तसें कार्य सत्. यावज्ज्ञान अनंत. ज्ञानाशिवाय कोणत्याच गोष्टीने नाश नाही. एकच वस्तु सगळें कार्य दृष्टि सृष्टीच्या दृष्टीने बीजरूपाने प्रकृतींत आहे. त्रिकालाबाधित आहे. नाश

होत नाही. असत् दृष्टि होते. यावरून जें जें कार्य तें सतच. जे जे मेले ते मेले नाही व जन्मले नाही. एक गोष्ट झाली किंवा होईल असें कांही नाही. एवढेंच की, कोण्यावेळेस बीजरूपानें तर कोण्यावेळेस आविर्भूत राहील. योगी वगैरे जे भूत भविष्य सांगतात व तसेंच घडून येतें यावरून हें सर्व त्यांना दिसत असलें पाहिजें म्हणजे त्यांना हें सर्व वर्तमान असलें पाहिजें. झाड तोडण्याचें मनांत आलें की ते आधी मनांत पडलेलेंच राहतें. पण साधनांच्या दुर्लभतेमुळे उशीर लागतो. त्याप्रमाणे कोणतीहि भविष्य गोष्ट कोण्यातरी प्रतिबंधामुळे दिसत नाही. कोणी म्हणतात योगी भविष्य सांगतात. ते पहिले नसते म्हणजे ते योग्याच्या संकल्पानें होते. (खंडण निदिध्यासन प्रकाश ६ समास) जर संकल्पानें योगी उत्पन्न करतो, तर त्यांच्या संकल्पानें मुक्तांनाहि बंधन होईल. दुसरें अनुभवानें योगी हा राजा, देश अमुक वेळेस लयास जाईल असें सांगतात. तर मग त्यांच्या माथीं हिंसा दोष येईल. म्हणून योगी कार्य पाहून सांगतात. संकल्पानें उपन्न करीत नाही. यावरून मेलेले मनुष्य योगानें दिसतात. वाल्मिकी ऋषीनें समाधीच्या योगानें सर्व रामचरित्र पाहून लिहून काढलें. ईश्वराला सर्व ज्ञान वर्तमान असल्यामुळे वेदांत भविष्य लिहून ठेविलें. यावरून वेद पौरुषेय नाही. भारतांत व्यासांनी मेलेलीं माणसें आणून दाखविलीं. श्रीकृष्णानें गुरुपुत्र आणून दिला यावरून कार्य सत्. ब्रह्मदृष्टया मिथ्या. पण शशश्रृंगवत् नाही. अज्ञानांना मागच्या पुढच्या गोष्टी स्वप्नांत दिसतात. एका बाईला तिचा नवरा मरणाच्या तीन दिवसपूर्वी तो मेला म्हणून स्वप्नांत दिसला. त्यांत ईश्वर तर सर्वज्ञानी आहे तर त्याला सर्व गोष्टी वर्तमान कशा राहणार नाही? इतर जीव युंजान योगी व ईश्वरयुक्त-योगी. जीवांना समाधींत ज्ञान पुनः आवरण. ईश्वर सदामुक्त, सर्व कालीं सर्वज्ञान असतें. लक्षणावरून जीवेश्वर ऐक्य आहे. वाच्यार्थानें नाही. मुक्त झाल्यावर जीव ईश्वरांत जाऊन मिळतो पण ईश्वर केव्हाच जीवांत मिळत नाही. कार्य त्रिकालानाश्य व कारणहि तसेंच. **त्रिकालनाश्य** म्हणजे केव्हाच उत्पन्न झालें नाही व केव्हाच नाशहि नाही. जगत् हेंच प्रकृति व प्रकृति हेंच जगत्. साम्यावस्था प्रकृति व विषमावस्था जगत्.

कार्य प्रकृतिरूप असून थोडे थोडे विरूपहि आहे. कार्य सत् म्हणूनच श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितलें,

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥११॥

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥१२॥

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥१३॥

१ व ३ यांत व्यावहारिक धीर सांगून २ व ४ मध्ये पारमार्थिक धीर सांगितला. जन्म मृत्यु मिथ्या.

हेतुमत् अनित्यमव्यापिसक्रियमनेकमाश्रितं लिंगम् ।
सावयवं परतंत्रं व्यक्तं विपरीतमव्यक्तम् ॥१०॥

अंकी मस्तकी बाला रथ ज्याचा जाहला असे अवनीं ।
दश भुज पंचवदन तो निज भक्तांच्या सदा असे अवनी ॥

हेतुमत्–हेतुः अस्यास्ति इति. न नित्यं–अनित्यं. त्रिषु कालेषु तिष्ठति तन्नित्यं अव्यापि–व्यापणार नाही तें. सक्रिय–क्रियासहितं, अनेकं आश्रितं––कशावर अवलंबून असणारें. लिंग–चिन्ह. जसें अग्नीचें अनुमानास धूम. सावयव–अवयसहित. ज्याचे तुकडे होऊं शकतात. परतंत्र–परतंत्र असणारें-व्यक्तं–अव्यक्त विपरितं. व्यक्तं प्रधान लक्षणं विभजते. पूर्वी कार्य सत् सांगितलें. एवं कार्य सत्. अव्यक्त सत् व पुरुष सत्. तर मग कार्य, पुरुष अव्यक्त एकच की काय ? सगळे एकच तर मग देहाहून आत्म्याचा विवेक व्हावा कसा ? मग विवेकाची आवश्यकता नाही. कार्य व अव्यक्त हे जरी सत् आहेत तथापि पुरुषासारखे सत् नाहीत. यांचा नाश जरी होत नाही तरी बाध म्हणजे असत् दृष्टि होते. व्यक्त म्हणजे महदादिक कार्य व अव्यक्त म्हणजे प्रकृति. व्यक्त हे हेतुमत् आहे म्हणजे याला कारण

आहे. हेतुमत् कारण, उपादान हे पर्यायवाची शब्द आहेत. सर्व कार्याला प्रकृति कारणं. बुद्धीला प्रकृति कारण, अहंकाराला बुद्धि कारण, एवं प्रकृति कार्याला कारण. म्हणून बुद्धि प्रकृतीच्या योगाने हेतुमत्. पुनः कार्य अनित्य आहे. जरी सत्कार्य आहे तरी बाध होतो. जसें दुधांत दही असतें त्याप्रमाणे. आपलीं स्थूल शरीरें दहराकाशांत राहतात व पृथ्वीवर येतात, त्यावेळेस आविर्भूत होतात. आपल्याकडे मेल्यावर लिंग शरीर गमन करितें असें म्हणतात, पण ही भ्रांति आहे. कारण लिंग शरीर, अपंचीकृत आहे, पंचीकृत नाही. म्हणून त्यांच्यांत पंचभूतें नाहीत. तर मग गमन कसें करिते? कारण भूत निराळ्या रीतीने निघून गेलें पाहिजें? ते मेल्यावर लिंग शरीर एकदम कोणाच्या आश्रयाने दुसऱ्या जन्मांत जातें? तें स्थूल शरीराच्या आश्रयाने जाते. हीं स्थूल शरीरें दहराकाशांत असतात. तसें नसतें तर श्री व्यासाला मेलेलीं माणसें दाखवितां आलीं नसतीं. हें सगळें कार्य आविर्भावदशेंत तरी अनित्य मानणें म्हणजे ब्रह्मदृष्टीने त्याचा बाध होणें किंवा प्रकृति अपेक्षेने अनित्य मानणें आहे. प्रकृतिपासून सगळे उत्पन्न, प्रकृति कशापासूनच उत्पन्न नाही, म्हणून प्रकृति सत्य. व्यक्त अव्यापि आहे म्हणजे सर्वत्र राहात नाही. वायुजलाचें ठिकाणीं नाही. वारा म्हणजे जल नव्हे. **अनेकं** एक नाही. **आश्रितं**—या व्यक्ताला, प्रकृतीचा आधार आहे. जसें अग्नीचें धूम लिंग तसें अस्ति प्रधानं बुद्ध्यादिकार्यतोपलंभात् प्रकृतीच्या अनुमानाविषयीं हें व्यक्त लिंग झालें. **सावयवं**—तुकडे होऊं शकतात. पृथ्वीचे परमाणु होऊं शकतात. अणुमात्र पदार्थालाच प्रतिबंध होतो. आकाशाचेहि तुकडे होतात. सगळ्या पदार्थांत आकाश आहेच. प्रत्येक अणूंत देखील आहे. वास्तविक हें सर्व दृश्य आकाशाचे परमाणु आहेत. कारण प्रत्येक परमाणुमध्ये आकाश आहेच. मन आपलें आपल्यास समजतें. मनांत आकाश नाही. कारण आकाश मनास समजतें. कारण ज्याचे भाग होतात त्याला अवयव पाहिजेत. शब्दतन्मात्राहि अवयवी आहे, कारण शब्द जेव्हा उठतो, त्यावेळेस वायु नाही अशा पदार्थांतून उठत नाही. वायु शब्दास वाहक आहे. पण पाण्यांतून शब्द ऐकूं येतात ते पाण्यामुळे. शब्दाचे तुकडे होतात. शब्द तन्मात्रेला अवयव आहेत. स्पर्श

करून जर हात तसाच्या तसाच ठेविला तर त्याचा स्पर्श आपणास भासणार नाही. तसेंच रूप, रस, गंध, तन्मात्रा अवयवी आहेत. लाल एकच असतें तर सर्व ठिकाणीं व्यापक असतें. जें अनेक आश्रित असतें त्याला अवयव असतातच. यद्यपि नैय्यायिक द्रव्याला अवयव मानतात, गुणाला अवयव मानीत नाहीत. या एका भिंतीला लालपणा दिला व तसाच दुसऱ्या भिंतीला दिला तर ते पदार्थाच्या आश्रयाने दोनपणा मानतात. शब्दादिक नैय्यायिक गुण मानतात. द्रव्य मानीत नाहीत. तरी सांख्यांत कार्य द्रव्य मानतात, गुण मानत नाहीत. चिंचेचें पाणीच दोन्ही ठिकाणीं घेतल्यास दोन भांड्याच्या आश्रयाने दोनपणा लाल रंगास येईल. पण भिन्न जसें चिंचेचें पाणी आणि गेरू घेतल्यास द्रव्याच्या विभागाने कांही लालपणाचा विभाग नाही. नैय्यायिक द्रव्याच्या विभागानें दोनपणा मानतात. गुणाच्या विभागाने मानत नाही. विभाग मानत नसल्यामुळे तन्मात्रा गुण मानतात. गंधालाहि अवयव आहेत. एखाद्या फुलाचा वास भ्रमराने घेतला व मागाहून आपण त्या फुलाचा वास घेतला तर कमी येतो. नैय्यायिक म्हणतात त्याच्या गंधाचे कांही परमाणू निघून जातात. तेहि चांगल्या व वाईट अशा दोन प्रकारचे गंध मानतात. डोळ्याला विभाग आहे. डोळे कानाचें कांही काम करीत नाही. योगाने कोणत्याहि इंद्रियाचें काम कोणत्याहि इंद्रियाकडून करतां येतें व नारकीय अमीबा प्राण्याला एका अवययापासून दुसरें अवयव उत्पन्न करतां येतें, म्हणून इंद्रियाला विभाग नाही म्हणणें चुकीचे आहे. योगी, भलत्याच इंद्रियाने भलत्या इंद्रियाचें काम करीत नाही. पण भलत्या गोलकाने भलत्या गोलकाचें काम करतात. म्हणजे एका इंद्रियाची शक्ति दुसऱ्या इंद्रियाच्या ठिकाणीं उत्पन्न करतात. भलत्या इंद्रियाने भलत्या इंद्रियाचें काम करतां येतें म्हणजे एका इंद्रियाची शक्ति दुसऱ्या इंद्रियाच्या ठिकाणीं उत्पन्न करतां येते. मनहि तसेंच, विभागित आहे. विभागित नसतें तर मन एकीकडे लागलें तर दुसरीकडे मन राहात नाही असें झालें नसतें. अहंकाराला अवयव आहेत. कारण माझ्या ठिकाणचा अहंकार तुमच्या ठिकाणीं बाध करूं शकत नाही. परतंत्र परंपरेने एकमेकांचें स्वाधीन.

अव्यक्त याच्या विपरीत आहे व्यक्तहेतुमत् तर अव्यक्त अहेतुमत्. एवं सर्वच यद्यपि प्रधानांत तीन गुण असल्यामुळे विभाग होणें शक्य वाटते पण त्याचे विभाग कोण करणार ? मन त्याचें कार्य आहे. अव्यक्त स्वतंत्र आहे. या ठिकाणीं सांख्य चुकले आहे. येथे प्रकृति स्वतंत्र मानल्यास प्रकृति जड आहे, चेतनावाचून स्वातंत्र्य नाही. ज्ञानावाचून जड कांही करूं शकत नाही, हें प्रत्यक्ष आहे. यावरून अनुमान करावयाचें की, प्रकृति जड, चेतनाशिवाय कांही करूं शकत नाही. पतंजलींनी प्रकृतीला स्वाधीन ठेवणारा पुरूष मानला आहे. कपिलांनीहि हेंच मानलें आहे. येथे स्वतंत्र म्हणजे एवढेंच घ्यावयाचें की, जशी तलवार कापण्यास स्वतंत्र पण कापण्यास लावण्याकरिता कोणी पाहिजे तसें प्रधान कार्य उत्पन्न करण्यास स्वतंत्र नाही. हा **समन्वय झाला**.

त्रिगुणमविवेक विषयः सामान्यमचेतनंप्रसव धर्मी ।
व्यक्तं तथा प्रधानं तद्विहरीतस्तथाचपुमान् ॥११॥

त्रयोगुणायस्येति. न विवेकी-अविवेकी. विषय-ज्ञेय. प्रसवोधर्मयस्येति. विपरित—निराळा. काल व्यक्ताव्यक्ताचें वैधर्म्य सांगितलें. आज साधर्म्य सांगतो. इतश्च साधर्म्य वैधर्म्य ज्ञानमेव विवेक ज्ञानाय भवितुमर्हति. स्पष्टगोचरत्वात्. यद्यत् स्पष्ट गोचरं तत्तत् ज्ञातम्. घटपटादिवत्. साधर्म्य —सारखे धर्म. वैधर्म्य—विशेष धर्म. तथा च पदावरून प्रकृति पुरुषाचें साधर्म्य सांगतात. पूर्वी प्रधान अहेतुमत्=कोणापासून उत्पन्न होत नाही. असें सांगितलें. त्याचप्रमाणे पुरुष अहेतुमत. प्रधाननित्य=पुरुष नित्य. प्रधान अक्रिय—पुरुष अक्रिय. प्रधान एक—पुरुषहि एकच. पुरुष बहुत्व सांख्य मानतात. हें अनुमान दृष्टीने पुष्कळ सांगितलें पण मुक्तीच्या वेळेस एकच. एकच पुरुष मानल्यास एकाला मुक्ति तर सर्वांना मुक्ति, एकाला मरण तर सर्वांना मरण असा गोंधळ होईल, करिता हें पुरुष बहुत्व औपचारिक सांगितलें आहे. प्रधान लिंगरहित व पुरुषहि लिंगरहित. मागे जें पुरुषाचें अनुमानज्ञान सांगितलें, तें भ्रमाने सांगितलें. म्हणजे भ्रमाला अधिष्ठान पाहिजे, अशा अनुमानाने सांगितलें. पुढे प्रधानाचें अनुमान करितांना लिंग आहे असें सांगतील. प्रधान जसें अनाश्रित तसा पुरुषहि

अनाश्रित. प्रधान जसें निरवयव तसा पुरुषहि. प्रधानाप्रमाणे पुरुषहि स्वतंत्र. याप्रमाणे साधर्म्य झालें. आता वैधर्म्य सांगतात. व्यक्ताचे व प्रधानाचें साधर्म्य व पुरुषाचें त्यापासून वैधर्म्य. "कारणगुणाहि कार्ये उत्पद्यंते." कार्यामध्ये कारणाचें गुण येतात. जसें कृष्णतंतूपासून कृष्णपट. व्यक्त, त्रिगुणात्मक व प्रधानहि त्रिगुणात्मक. पुरुष निर्गुण आहे. व्यक्त अविवेकी. बुद्धीला हा अहंकार आहे व ही मी असा विवेक होत नाही. तसा प्रधानालाहि विवेक करतां येत नाही. **विषयः**—प्रधान व व्यक्त पुरुषाचे विषय आहेत म्हणजे पुरुषाला कळतात. **सामान्यं**—व्यक्ताला जाति आहे तसा प्रधानालाहि आहे. सामान्य-सर्व ठिकाणीं सारखा असणें. व्यक्त अचेतन. प्रधानहि तसेंच. व्यक्त प्रसवधर्मी व प्रधानहि तसेंच. हे धर्म पुरुषाचें ठिकाणीं नाही. जर पुरुष सदा विवेक करणारा आहे तर मग सदा मुक्तच ?

**उत्तर**:—पुरुष पूर्व कार्याचा अध्यास करून उतर कार्याचा विवेक करतो. विवेक म्हणजे पृथक्ज्ञान. जेव्हा मनुष्य "हा दगड" व "हा खांब" असा विवेक करतो त्यावेळेस देहाचा अध्यास असतो. अज्ञानदशेमध्ये सुखी असल्यास पुत्रादिकाहून मी पृथक असा विवेक करतो, पण पुत्रादिकांचे ठिकाणीं ममताध्यास ठेवतो. पुत्रादिक मृत झाले असतां, मी एकटाच आहे, असा विवेक करतो. अवयव दुखल्यास ममताध्यास करतो पण अवयव गळून गेल्यावर मी वेगळा. मला अवयव नाही असा विवेक करतो. अशा प्रमाणे व्यवहारांत पुरुष विवेक करतो. पण मन, प्राण वगैरे लिंग शरीराचे ठिकाणीं विवेक करीत नाही. यद्यपि केव्हा केव्हा इंद्रियापासून विवेक करतो पण अहंकार, बुद्धि, मन यांच्यापासून विवेक होत नाही. राग द्वेषकालींहि विवेक करतो. याप्रमाणे विद्वानांचा विवेक मनापर्यंत जातो. विद्वान बुद्धीचा आत्म्यापासून विवेक करतात. असा पुरुष विवेक करून कार्याचें धर्म आपल्यावर घेतलें नाही म्हणजे मुक्त होतो. प्रधान व व्यक्त पुरुषाला कळतात. पुरुष कोणाचा विषय नाही. कोणाला कळत नाही. निर्विषय आहे. यद्यपि व्यक्ताव्यक्त पुरुषाचे विषय आहे व तेणेकरून विषयी आहे. तथापि मुक्त पुरुष विषयी नाही. बद्ध पुरुष विषयी आहे. यासाठीच बहुपुरुषत्व मानलें आहे. व्यक्ताव्यक्ताला जाति आहे

तशी पुरुषत्व म्हणून जाति नाही. "एकत्वे नित्त्यत्वे"–जाति. यावरून एकच पुरुष मानला आहे. ज्या अवस्थेंत जन्म मरण होतात त्या अवस्थेंत बहुपुरुषत्व मानलें आहे. व्यक्ताव्यक्त पुरुषाचे विषय काय म्हणून आहेत? व्यक्ताव्यक्त अचेतन आहे. पुरुष हा आपल्याला जाणतो व विवेकाने आपल्याला दुसऱ्यापासूव व्यक्ताव्यक्ताहून निराळा करून घेतो. जें जाणतें तेंच आपल्याला दुसऱ्यापासून पृथक व संयोग करून घेऊं शकतें. प्रधान आपल्याला जाणत नाही, म्हणजे पृथक संयोग करून घेऊं शकत नाही. यद्यपि या विवेकज्ञानाला राजस म्हटलें नाही, पण तूं, मी, पशु असें पृथक्‌पणाने पाहणें याला राजस म्हणतात. हा विवेक बंधाला कारण आहे, कारण हा जड आहे. प्रधान पुरुषाचें ज्ञान संसारास तोडण्यास समर्थ असल्यामुळे राजस नाही. भगवान म्हणतात,–"क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम" ॥ व्यक्त, अव्यक्त, प्रसवधर्मी आहेत तसा पुरुष नाही. पुरुषापासून कांही उत्पन्न होत नाही. नैय्यायिकाप्रमाणे सांख्यांत ईश्वर मानला नाही. पुरुष कांही उत्पन्न करीत नसल्यामुळे कर्तृत्व त्याचेकडे नाही. जडाचे संघातेमुळे उत्पत्ति वगैरे कार्य होतें. एवं हें विवेकज्ञान झालें. सांख्यसारांत अशा प्रकारचा विवेक नाही. पुरुषाचे ठिकाणीं सच्चिदानंदरूप मानलें आहे व याचे उलट प्रकृतीचे ठिकाणीं स्थापित केलें आहे. यावरून प्रकृतीला मिथ्या मानतात. हें सर्व जड म्हणून असत् असें सांगितलें आहे. "असत् जडं परमार्थं दृष्टयां" मुक्तिकालीं. प्रकृति कालीं जड मानली दिसते.

"नानोपाधिषुयन्नाना–" सांख्य दर्शन.

यत्सामान्य चिद्रुपं नाना उपाधिषु नाना भाति-अशा प्रकारच्या चित् सामान्याची जो उपासना करितो, चैतन्यैकघनवस्तुचें ठिकाणीं ईश्वरत्व, अनेश्वरत्वादि मूर्ख पाहतात, ती वस्तु मी आहे.

---

।। श्री ज्ञानेश्वरमाउली प्रसन्न ।।

# २७

प्रित्यप्रीति विषादात्मकाः प्रकाशप्रवृत्ति नियमार्थाः ।।
अनोन्याभिभवाश्रय जनन मिथुन वृत्तयश्चगुणाः ।।१२।।

याप्रमाणे प्रकृति, जगत् व आत्मा यांचें साधर्म्य व वैधर्म्य सांगितलें. प्रकृति गुण साम्यावस्था असल्यामुळे तिच्या गुण विषमतेने जगदुत्पत्ति होते. म्हणून गुणाची विषमता, करिता गुणांचा उपक्रम करितो तो प्रक्रियेस हेतुभूत आहे.

जसें अतिशय प्रकाशांतून आल्यावर कांही दिसत नाही व थोडया वेळाने दिसूं लागतें, तसें दिवस मावळल्यावर एकदम रात्र झाली असतां तर कोणालाच कांही दिसलें नसतें, पण मध्ये सायंकाळ असल्यामुळे थोडे थोडे अंधाराची सवय होऊन दिसूं लागतें. तसेंच सकाळीं. रात्र गेल्याबरोबर सूर्य उगवला असतां तर झालें असतें त्याप्रमाणे सत्व व तम अतिविरोधी हे दोनच गुण घेतले असते, तर परस्पर नाश झाला असता. म्हणून रजोगुण घेतला. याच्या योगाने त्याचा नाश होत नाही. प्रीतीश्च अप्रितिश्च–विषादाः तदात्मकाः– प्रित्यप्रीति – विषादात्मकाः– प्रकाशश्च प्रवृत्तिश्च निमयश्च ने एत्र अर्थाः सामर्थ्यं एषांते–प्रकाश प्रवृत्ति आहे अर्थ ज्याचे. अन्योन्यं अभिभवंति अन्योन्यं आश्रयंते–अन्योन्य जनयंति– अन्योन्यं मिथुनि भवंति–अन्योन्यं वर्तंत–गुणान् विभज्यते–गुणांचा विभाग करून सांगतातः–

**भाष्य सांगतातः**–हे गुण पिंडस्थ म्हणजे आपल्या ठिकाणीं व ब्रह्मांडस्थ म्हणजे जगस्थ अशी व्याप्ति दाखवितात. हें द्रव्य आहेत. नवैशेषिकागुणाः संयोग विभागत्वात्. हे गुण नाहीत. (याचें निरूपण मागे केलें आहे)

**य.ची व्याप्ति**–सत्व प्रितिरूप आहे. राग आपल्याला एखाद्या वस्तू विषयी असतो. ती जवळ नसल्यास दु:ख होतें. पण जेथे आपल्याला वस्तु द्वैत असून जी वस्तु सुखकर वाटते त्यावर प्रीति जडते. ही प्रीति सत्व गुणाचें स्वरूप आहे. अप्रीति रजोगुणाचें स्वरूप आहे. विषाद=मोह–तमोगुणाचें स्वरूप आहे. अनुकूल वेदनात्मक वृति=सुख प्रतिकुलवृत्ति–दु:ख कुंठित वृत्ति–मोह. यद्यपि आत्मज्ञानाच्या ठिकाणीं मनोवृत्ति कुंठित होते पण सूक्ष्म बुद्धि आत्माकार होत असते म्हणून अनुकूल वृत्ति असते कुंठित वृत्ति नसते. सत्व रजस्तमस यांचे प्रीति, दु:ख, विषाद हे धर्म प्राणीगणांत समजण्यासारखे आहेत. हे गुण फक्त प्राणीगणांतच राहतात असें नाही तर जडांतहि आहेत व ब्रह्मांडांतहि आहेत.

जाणण्याला हेतु भूत त्याला प्रकाश म्हणतात. **जनक, याज्ञवल्क्य संवाद**:– जनकाने विचारलें–महाराज ! आपण पदार्थ कोणत्या प्रकाशाने पाहतो ? सूर्य प्रकाशाने. सूर्य अस्त झाल्यावर चंद्राच्या प्रकाशाने, चंद्र मावळल्यावर अग्नि व अग्नीच्या अस्तांत वाक्ज्योतीने. उदा० इकडे ये, तिकडे जा इत्यादि संज्ञेने व्यवहार करितो. व्यवहाराला हेतुभूत शब्द आहे. जागृतींत हे चारच प्रकाश कामाचे आहेत. स्वप्नांत आत्मज्योति. या सर्व ज्योति आत्म्यापासूनच उत्पन्न होतात असें जनकाला ज्योतिर्ब्राह्मणांत सांगितलें आहे. वेदांताच्या रीतीने आत्मज्योतीपासून सर्व ज्योति आहेत व उपाधीच्या योगाने चंद्रसूर्यादि भासतात.

प्रकाश दोन प्रकारचा–बाह्य व अंत:प्रकाश. सूर्य वगैरे=बाह्य प्रकाश. अंत:प्रकाश=पदार्थ वगैरे ओळखणें. आंत बाहेर प्रकाशानेंच जाणणें होते. कशावरून ? दगड, आकाश ह्या वस्तु कोणाला जाणत नाही. आंतल्या प्रकाशानेच आपल्याला कोणतीहि वस्तु दिसतें. प्रकाश सत्वप्रधान आहे. पुस्तक आहे म्हणून हें आपल्या अंत:करणांतील प्रकाशाने समजलें. अंत:करणांतील लोभ, मोह यांना हा पैसा वगैरे समजत नाही. सर्प हा भय वृत्तीने समजत नाही, तर आपल्या अंत:करणांत अशा वृत्ति आहेत, पण प्रकाशक वृत्ति निराळीच आहे.

विषयभिव्यंजको. . . . .

प्रकाश उष्णता एक नाही......

रंग दिसणें हा प्रकाश नव्हे. प्रकाश्याला प्रकाश दिसत नाही. रंग जर प्रकाश म्हणावा तर डोळ्याला काय प्रकाश्य म्हणावें ? जाणण्याची शक्ति बाह्य पदार्थोपहित होऊन प्रकाशक होते. एवं इंद्रियांनी जें जें समजतें तो सर्व प्रकाश धर्मच आहे. "तेज भिन्न प्रकाशश्चैतन्यं"— मनांतील गोष्टहि अशीच आहे. मेंदूवर जे हे Vibrations जातात म्हणून रंगच जातात व तिकडून उलटतात व रंग रूपाने दिसतात. प्रकाशरूपच दिसतात म्हणजे प्रकाश वस्तुच मेंदूंत जातात. प्रकाश जात नाही. मनांत ज्या ज्या वृत्ति उठतात त्या आपण जाणतो. हा अंत:प्रकाश व बाहेरचा प्रकाश एकच. व एकच चैतन्य आहे तरी हा प्रकाश, हा माझा देह, हा तुझा देह हे भेद सत्वोपाधि करिते. वृत्तीनिष्ठ प्रकाशाला सत्व म्हणतात. भेद वगैरे वृत्ति काढून टाकल्यास तोच आत्मप्रकाश होतो. असा हा प्रकाश बाहेर व आंत भेद दाखवितो. गति लक्षणं प्रवृत्ति म्हणजे गति पर्याय. प्रवृत्ति ठिकाणीं प्रकाश धर्म नसतात. कसे ? हें पुस्तक हाललें म्हणजे प्रकाश धर्म नाही. प्रकाश व गति एक नाही. ज्याला गति त्याला प्रकाश असतो, असा नियम नाही. दिवा गेल्यावर हालविला तर गति आहे पण प्रकाश नाही म्हणून पदार्थ हालला म्हणजे दिसतो म्हणणें मूर्खपणा आहे. पदार्थाचे किरण, रंग असणें ही गति आहे. उदा० जलमेघ. सूर्यादिकांचे ठिकाणीं प्रकाश प्रधान, जल, दुध, तेल यांचे ठिकाणीं गति जास्त प्रकाश कमी. आपलें मन काशींत जातें तर काशीस जाणारी वृत्ति काशीस ओळखत नाही. ह्या दोन्ही वृत्ति निराळ्या. मनाची गति रजोगुणात्मक आहे. तमस=नियम=स्थिरता. प्रकाश व प्रवृत्ति याहून रहित याला नियमन नुसती स्थिरता असणें. गति किंवा स्थिति समजत नाही. ही गोष्ट जरी खरी तरी कमीजास्त गति किंवा स्थिति असतेच. गति अव्यक्त राहून स्थिति प्रगट होते. ही स्थिति तमोगुणी आहे. काल वगैरे तमोगुणी. अंत:करणांतील निद्रा तमोगुणी. ज्ञान सुख सत्व गुण. चांचल्य—रजोगुण.

काल सर्व प्रकाश आत्मप्रकाशापासूनच आहे असें सांगितलें. आणि तो वृत्त्युपहित झाला असतां सत्व होतो व तसेंच सूर्याद्युपहित झाला असतां

बाह्य प्रकाश होतो. या प्रकाशास भावाभावाची अपेक्षा नाही. पदार्थ आहे जसा प्रतीत होतो, तसा पदार्थाचा अभावहि प्रतीत होतो. आत्मप्रकाशाचेंच सर्व लक्षण आहे. एवढेंच आत्मप्रकाशस्यैव वृत्त्युपहित्वे सति परिछिन्नत्वं सत्वत्वं=वृत्त्युपहित झाला असतां सत्व होतो. परंतु हा विवेक आहे. यद्यपि आत्मप्रकाश वृत्त्युपहित होत्साता सत्वत्वाप्रत पावतो तथापि क्रोधादिवृत्त्युपहित आत्मप्रकाश सत्व होत नाही. कारण या वृत्तीपासून कोणाचा प्रकाश होत नाही. जसें:—हे विष्णुपंत आहे, हें समजणें आत्म्याचें लक्षण नाही. यद्यपि सर्वच पदार्थ साक्षिभास्य आहे तरी पदार्थाकार जी वृत्ति आहे म्हणजे पदार्थत्वेकरून कळणें हें साक्षीचें काम नाही. हा अभिमान साक्षीभिन्न ज्ञानग्रहण करतो. तो वृत्तिनिष्ठ प्रकाश धरतो. आत्मप्रकाश सर्वांकिडेच आहे; पण क्रोधादिवृत्तीनें प्रकाश होत नाही म्हणजे आत्मप्रकाश घेणाऱ्या अविद्येच्या वृत्तीला सत्व म्हणतात. सत्वनिष्ठ आत्मप्रकाशाच्या वृत्तीला जीव म्हणतात. आत्मप्रकाश ग्रहणानुकूल वृत्ति उपाधिसत्व तत्स्थ आत्मप्रकाश तो चिदाभास. हा चिदाभास वास्तविक आत्मप्रकाश पण वृत्तिनिष्ठ आहे. वृत्तीचा व त्याचा अविवेक होणें याला बंधन म्हणतात. आत्मप्रकाश वृत्तिनिष्ठ मानून घेणें याला बंधन म्हणतात. मी व वृत्ति निराळी असें मानणें ती मुक्ति. वृत्ति=अविद्येची. सत्वादि तीन गुण अन्योन्याभिव आहेत. यांत सत्वांत आत्मप्रकाश अधिक प्रवृत्ति, नियमन हेहि आत्मप्रकाशानेच कळतात. पण त्यांचे ठिकाणीं आत्मप्रकाश नाही, आणि सत्वाचें ठिकाणीं आत्मप्रकाश व आत्मप्रकाशाचें ठिकाणीं सत्व. कांच सूर्यांत उभा केला म्हणजे सूर्य त्यांच्यांत व तो सूर्याच्या उष्णतेंत. पण माती तशी नाही. दोन (रज, तम) गुण आत्मप्रकाशानें प्रकाशित पण त्यांचे ठिकाणीं आत्मप्रकाश नाही. या सत्वगुणापासूनच देवता उत्पन्न होतात. हें पुढे सांगूं. रजोगुणापासून इंद्रियें व तामस गुणापासून भूतें. सात्विक अहंकारापासून देवता. राजस अहंकारापासून इंद्रियें व तामस अहंकारापासून भूतें. या देवतांच्या ठिकाणीं आत्मप्रकाश अधिक आहे. जडादिकांचें ठिकाणीं कमी व आपल्या ठिकाणीं मध्यम आहे. मनुष्याला इंद्रिय प्रधान जास्त, जडास इंद्रिय प्रधान कमी पण भूत प्रधान

जास्त आहे तर जड भूतावर जास्त अवलंबून असतात. देवतांच्यांत इंद्रियें आहेत पण प्रकाशावर जास्त अवलंबून असतात. आपल्याला इंद्रियानुसार मन वळवितां येतें पण मनानुसार इंद्रियें वळवतां येत नाही. जड मेल्या मुर्द्यासारखें पडलें असतात. व्यापार चालला असतो पण रोग्यासारखे नेहमीच दुःखी. उदा० आकाशांत पक्षी उडलेले पाहून आपल्याला उडण्याची इच्छा होते, पण इच्छा तृप्त होत नाही. याप्रमाणे या जडांना आपल्या-सारख्या इच्छा आहेत पण तृप्त न झाल्यामुळे नेहमी दुःखी. देवतांचीं अंतःकरणानुसार इंद्रियें असतात. आपल्याजवळ सत्व थोडे व गुण तर फार आहे तर तो बाकीच्या देवतांचे ठिकाणीं राहतो. आपली मध्य स्थिति आहे. जर आपण इंद्रियावर संयम न केला तर अनंत जन्मपर्यंत मनुष्य होऊं आणि विषयावर संयम न केल्यास जडांत जाऊं व अंतःकरणाच्या ठिकाणीं वासनारोध करीत गेलो तर देवयोनींत जाऊं. याप्रमाणे सत्व, रज, तमात्मक सर्ग तयार झाला. स्वर्गांतहि अप्सराचे भोग सांगितलें आहे, तर हे भोग जरी सत्वमय आहेत तरी हें फल सत्वाचें नव्हे, तर येथील यज्ञ वगैरे करण्याच्या समयीं यज्ञ केल्याने स्वर्गांत अप्सरा भोग मिळतात अशी जी वासना त्या वासनेचें फळ आहे. हे भोग रजानेच घडतात. स्वर्ग सत्वप्रधान आहे, पण निःशेष सत्वच नाही. ज्यावेळेस प्रवृत्ति त्यावेळेस स्थिति व प्रकाश कमी. आणि स्थितीच्या वेळीं बाकी दोन कमी. एवं प्रकाशाचे वेळीं देवता ज्यांच्या हृदयांत आविर्भूत होतात त्यांना इंद्रियावर प्रीति कमी. इंद्रियप्रीति असते त्या मनुष्याला देवतादर्शन होत नाही. सत्व कमी असल्यामुळे दर्शन होत नाही. जसें आपल्याला सत्वांत व जडांत जाणें कठिण तसें देवतांना रजांत येणें कठिण. उत्तम योग्यांना सर्वदा सत्व प्रादुर्भावच असतो. म्हणून सर्वदा देवतादर्शन होतें. पुढे कांही लोक ज्यांचा दिवसभर सत्व उद्भूत न होतां स्वप्नांत होतो त्यांना स्वप्नांत देवतादर्शन होतें. याप्रमाणे अन्योन्याभिभव होतो. तसे प्रीति असली तर अप्रिति नाही वगैरे सत्वाचे ठिकाणीं आत्मप्रकाश व रजतमाचे ठिकाणीं नाही. अत्यंत सत्वनिष्ठ पुरुष नेहमी आत्मप्रकाशांत असतो. भगवान म्हणतात,—"मत्स्थानि सर्व भूतानि. . . . . " माझे ठिकाणीं भूतें

आहेत. मी त्यांचे ठिकाणीं नाही. हे रजतम भूताविषयींच म्हटलें आहे. "ये भजंते तु मां भक्त्या. . . ." हे सत्वनिष्ठाविषयी म्हटलें आहे.

याप्रमाणे हे गुण अन्योन्याश्रय आहेत. कसे ? हे प्रत्येक स्वतंत्र राहूं शकत नाही. उदा० प्रीति. एका ठिकाणीं असली तर दुसऱ्या ठिकाणीं अप्रीति. स्थिति जर आहे तर ती समजण्याकरिता आत्मप्रकाश पाहिजेच. म्हणून हे अन्योन्याश्रय आहेत. सत्वापासून रज, रजापासून तम, तमापासून सत्व इत्यादि उत्पन्न होतात. पण तमादिकांपासून दुसरें उत्पन्न होतें तेव्हां पहिल्याचा अभिभव होत असल्यामुळें समजून पडत नाही. स्वप्नांत एकाच वेळेस आपण देव होऊन जातो. रज तम हे एकमेकांस उत्पन्न करीत असतात. जर देवता नसल्या तर आपण पुनर्जन्मांत जे कर्म करतो त्याची स्मृति कोणाला राहते ? कर्माला राहात नाही. देवतांचे सहाय्य पाहिजे. कर्माशिवाय देवता कांही फल देऊं शकत नाही. म्हणून प्रवृत्ति पाहिजे. अन्योन्यवृत्ति आहेत. परस्पर वर्तन करणारे आहेत. एकाच पदार्थाचें ठिकाणीं भिन्न रूपाने तिन्ही एकसमयावच्छेदेंकरून सारख्या प्रमाणे असतात . उ० दिवा. प्रकाश सत्व गुण. जळणें प्रवृत्ति-रजोगुण व दिव्याच्या खाली अंधार हा तमोगुण. किंवा राजा सुष्टांना पालनकर्ता, दुष्टांना शासनकर्ता किंवा स्त्रीपासून पतिला सुख, सवतीला दुःख व परपुरुषाला मोह. "कामिन्यासुखताभर्त्रा. . ." परंतु ही प्रकृति नाही. प्रकृतींत तीन्ही गुणाचें कार्य एकाच ठिकाणीं घडतात. पण येथे तीन गुणांचें कार्य निरनिराळ्या पदार्थावर होते. प्रकृति विषमावस्था झाल्याशिवाय दुसऱ्याला गुण मिळणें शक्य नाही. परस्परांचें निरनिराळे लक्षण सांगतील. या कारिकेंत गुणांची वागणूक सामर्थ्य सांगितलें.

सत्वंलघुप्रकाशकमिष्टमुपष्टंभकं चलंच रजः ।
गुरुवरण कमेवतमः प्रदीपवच्चार्थतो वृत्तिः ।।१३।।

सत्वं=सतः भावं, लघु=हलके, प्रकाशक=उजेड देणारे. इष्टं=आनंद देणारे. उपष्टंभकं=भ्रांतिकारक. चलं=दुःखकारक. गुरुवरणकं=भार असणें (भारी) प्रदीपवत्=प्रदीप. चकार समुच्चयर्थक.

**त्रिगुणाचें स्वरूप सांगतात**:-भाष्यांत जें गुणाचें स्वरूप सांगितलें तें कार्यावरूनच घेतलें आहे. सत्व हलकें आहे, प्रकाशक आहे, इष्ट आहे. सत्व वृद्धि पावतें, त्यावेळेस इंद्रियें हलकीं होतात. सत्व लघु. रज त्याच्या-पेक्षा जड=द्रवीभूत. जडाचा नियम असा आहे-अति हलक्या वस्तूंत थोडासा भारीपणा असला म्हणजे गति उत्पन्न होते किंवा अतिशय भारी पदार्थ असला तर गति उत्पन्न होत नाही. सत्व-लघु; रज-मध्यम; तम गुरु म्हणून रज चल आहे. आणि सत्व, तम अचल आहे. उदा० आकाश फार हलकें. त्याच्यांत भारीपणाचें मिश्रण झालें की, वायु चलन पावतो. नैय्यायिक म्हणतात गुरु म्हणजे भारीपणा तो जल व पृथ्वीचे ठिकाणीं राहतो. ज्योतिषवादी म्हणतात सिद्धांत शिरोमणीकार गुरुत्वाचा स्वीकार करतात. नक्षत्र व पृथ्वी गुरुत्वावर अवलंबून राहतात.

आद्यपतनासमवायी कारणं गुरुत्व-नैय्यायिक. पृथ्वी जल वृत्तिः असें नैय्यायिक म्हणतात. पृथ्वी व जल यावरून पृथ्वीजन्य व जलजन्य पदार्थ घ्यावयाचे. गुरुत्व पृथ्वी व जलाचें ठिकाणीं राहतें. म्हणून पृथ्वीजन्य व जलजन्य पदार्थ खाली पडतात. (पृथ्वीजन्य व जलजन्य पदार्थ) म्हणजे अग्नीचे पदार्थ व वायुचे पदार्थ खाली पडत नाही असें झालें. मोठा पदार्थ लहान पदार्थास ओढतो असें गुरुत्वाकर्षणाचें लक्षण केल्यास झाडे व झाडाचीं पानें यांनी वर जाऊंच नये पण तसें होत नाही. म्हणून हें लक्षण बरोबर नाही. ज्या पदार्थाचें जितकें गुरुत्व त्या मानाने पृथ्वीचें त्याला कर्षण असतें म्हणून अग्नीचे ठिकाणीं गुरुत्वाकर्षण नाही. कारण पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाने अग्नि आकर्षण केला जात नाही. याप्रमाणे पृथ्वीचे ठिकाणीं गुरुत्वाकर्षण आहे असें लक्षण व्यभिचार पावतें. कारण एखादा सोन्याचा गोळा घेतला व वर फेकला तर तोहि खाली येतो म्हणजे पृथ्वी ओढते. सुवर्ण हा तेजस् पदार्थ मानतात. पार्थीव मानित नाहीत. तथापि आकर जें तेज आहे त्यांचे ठिकाणीं गुरुत्वाकर्षण असतें. एक सोन्याची पृथ्वी तयार केली व एक सोन्याचा पदार्थ वर फेकला तर खाली येईल, म्हणजे सोन्यांत गुरुत्वाकर्षण मानावें लागतें व तेणेंकरून नैय्यायिक लक्षण चुकतें. सांख्य गुरुत्व तमामुळे मानतात. गुरुत्वाच्या मानाने पृथ्वीचें आकर्षण

असते, हें म्हणणें सयुक्तिक नाही. कारण झाडाच्या खांद्यावर जातात व लहान गोटे वर उडत नाहीत. कां? झाडांत वाढविणारी शक्ति आहे. त्यामुळे खांद्या वर जातात. झाडांच्या खांद्या कां वर जातात? तर गुरुत्वाकर्षणाच्या विरुद्ध शक्ति कोणती तरी असली पाहिजे. व तिला शास्त्रीयत्व आलें पाहिजें. गुरुत्वाच्या मानाने कर्षण असतें. हें उत्तर बरोबर नाही. झाडाच्या ठिकाणीं सत्वाचा प्रादुर्भाव होऊन तो पृथ्वीच्या कर्षणाच्या उलट वागतो. व झाडाच्या खांद्या वर नेतो. सत्वगुण स्वभावतः हलका म्हणजे तमाच्या उलट. येथे पृथ्वीपेक्षा हलका म्हणजे दुर्बल मनुष्य कां वर जात नाही. मनुष्याचा सत्वगुण शरीराच्या उपयोगांत कमी येतो. बुद्धीच्या (अंतःकरणाच्या) उपयोगांत फार येतो. शरीराला रजस्तम पोषक आहे. एक गोटा वर फेकला. त्याची गति गोटयाच्या उपयोगी म्हणजे गोटयाला वर जाण्याच्या उपयोगी आली पण हाताच्या वर जाण्याच्या कामांत येत नाही. कारण तो हात, गोटयाबरोबर वर जात नाही. सत्वाचा बुद्धीला जास्त फायदा आहे. वृक्ष, पक्षादिकांत बुद्धितत्त्व कमी म्हणजे सत्व हें त्यांच्या शरीराच्या कामास येतें. रजोधिक्य मनुष्य बुद्धिमान नसतात. बुद्धिमत्ता हा सत्वाचा (प्रकाशाचा) धर्म आहे. पक्षांत सत्व कमी. इष्ट धर्म मनुष्याच्या व पक्षाच्या ठिकाणीं सारखा. मनुष्याला देहाच्या पलीकडला आनंद घेणें शक्य आहे. पण इष्ट धर्म देहापुरताच असल्यामुळे तसें होत नाही. वृक्षादिकांचीं मूळें जमिनींत राहतात, तशी मनुष्याचे हात पाय जमिनीवर राहतात. भांडयांत पाणी तापविले व वाफ केली व भांडयाचें तोंड बंद केलें, तर सर्व वाफ होऊन भांडे वर जाईल तसें मनुष्यांत चित्रा नाडीचा मार्ग खुला आहे, त्या मार्गानें त्यांना वर जाता येते. पण पशु पक्षांत त्या नाडीचा मार्ग खुला नाही. म्हणून त्या सत्वाच्या योगाने त्यांचें शरीर वर जातें. या गुणाच्या संक्रमणाला नियामक शक्ति परमात्मा. मनुष्यांत सत्व जास्त, पक्षांत कमी, पशूंचे ठिकाणीं नाही. हा नियम परमात्माकडे आहे. असें आहे म्हणून आपण सांगूं पण असें कां? याचें उत्तर नाही. परमात्म्यास माहित. सत्वाच्या योगाने पदार्थ वर जातात व अनेक पदार्थ वर जातात असें सांगतां येईल, पण

असा गुणसंक्रमण कां हें सांगतां येत नाही. प्रयत्न समजण्यास ज्ञान पाहिजें. अमक्या रीतीने प्रयत्न केला पाहिजे असें पशु पक्षांना माहित झाल्यास त्यांनाहि ज्ञान होण्याचा संभव आहे.

परमेश्वर जी योजना करतो ती नेहमी राहावी असा त्यांचा संकल्प नसतो. मनुष्याचें स्वातंत्र्य कायम राहतें. बापाने द्रव्याचे भाग करून दिले. म्हणून असें सांगत नाही की, हें द्रव्य वाढवूं नको. तसा परमात्मा. जास्त कमी पुरुष प्रयत्नावर अवलंबून आहे. ईश्वर प्रयत्नरूपाने असतो. देवतांचे ठिकाणीं प्रकाशधर्म व लघुधर्म दोन्ही आहेत; त्यामुळे ज्ञानहि मोठे व आकाश संचारी राहतात. अति लघु (हलका) सत्व आहे, त्यामुळे गति नसते. अति हलक्या पदार्थांना गति नसते. अति हलका म्हणजे कोणत्या इंद्रियानें गोचर नाही. गुरुत्व असलेला पदार्थ इंद्रियगोचर आहे. तर मग रजोगुणाचे ठिकाणीं चलधर्म आहे; तरी पशु, पक्षी, मनुष्य यांच्या चालणें वगैरे व्यवहारांत सत्व आहे म्हणण्यापेक्षा रजच आहे म्हणणें बरें, पण तमाच्या अपेक्षेने तें सत्व आहे. रज हा सत्व व तमाची संधी आहे. अत्यंत सत्वरूप तें प्रकाशरूप व इंद्रियाला अगोचर तें हिरण्यगर्भच आहे. त्याच्यापेक्षा थोडा थोडा गुरुभाग देवतांचे ठिकाणीं म्हणून आपल्यापेक्षा पुष्कळ हलक्या म्हणून अदृश्य असतात. त्यांच्यापेक्षा पिशाच्च कमी. त्यांत मनुष्यापेक्षा प्रकाश जास्त. हरिहराच्या उपासनेपेक्षा पिशाच्य उपासना तिरस्कारयुक्त. केव्हा केव्हा दृश्य होतात. मनुष्य, क्रोध, भय वगैरेच्या योगानें गुरु होतो. हिरण्यगर्भापेक्षा देवतांत रज जास्त व उत्तरोत्तर अधिक होत जातो. पक्षांत लघुपणा जास्त पण प्रकाश कमी. पाषाणादिकांत लघुपणा फारच कमी व प्रकाशहि कमी. तमांतून सत्वांत जातांना रजाची पायरी आहे. **आता पिंडांत**– अति शांत मन चलन पावत नाही. दुसऱ्या पदार्थाच्या कल्पनेनें गुरु होऊन चलन पावतें, त्यामुळे इंद्रियें व हात पाय चलन पावतात. **बुद्धि**– निश्चय. निश्चय सत्वरूप. इष्टधर्म सर्वांचे ठिकाणीं सारखा. सर्वांना सुख पाहिजें. पण कोणाला देहाच्या सुखाची आसक्ति तर दुसऱ्याला गोष्टींची आसक्ति. सुखाची अपेक्षा निराळ्या प्रकारची.

**उपष्टंभः**– भ्रांति. रजांत पदार्थ निश्चित नाही. सर्व पदार्थ गतिमान आहेत किंवा नाही असा संशय रजगतिमान दुखःरूप आहे. अतिस्थिर

असणें आनंदाचें लक्षण (प्रकाशपण व लघुपण). ज्याला गमनागमन त्याला स्थिरता कमी. तमोगुणांत स्थिरता आहे पण प्रकाश नसल्यामुळे आनंद नाही. तमांत दुःख भासत नाही; व आनंदहि भासत नाही. तमाचा धर्म गुरुत्व आळस, निद्रा याप्रमाणे परस्पर विरुद्ध. सत्व रज तम हे परस्पर विरुद्ध आहेत तर मग कार्य कसें होतें ? जरी विरुद्ध आहेत तरी द्वंद्वज विरुद्ध नाहीत. अंशविरुद्धता आहे. जसे प्रकाश व अंधार आहे. तसें नाही. कमी जास्त मानानें विरुद्ध आहेत. विरुद्ध जरी आहेत तरी हें गुण पृथक असल्यामुळे उत्पत्ति निरनिराळी आहे. कार्यकारणभाव नाही. एकमेकां पासून उत्पत्ति जरी मागे सांगितली आहे ती प्राक् अनंतरपणानें मानली आहे. तेल व वात निराळे निराळे. अग्नि हा जाळणारा. हे परस्पर विरुद्ध तरी प्रकाशरूप कार्य होतें. त्याप्रमाणे या गुणापासून अर्थरूप कार्य होतें.

---

## विशेष व्याख्यान

काही नास्तिक म्हणतील विरोधी पदार्थापासून कार्योत्पत्ति केली. अशी आम्ही जड चैतन्यापासून कार्योत्पत्ति करितो.

**समाधान**:— आम्ही विरोधी पदार्थापासून कार्य निराळें काढलें तरी हे गुण अत्यंत विरोधी नाही. जड, चैतन्य अत्यंत विरोधी आहे. सत्व, उत्कट होतें तेव्हा इंद्रिय हलकें होऊन बुद्धि प्रकाश होतो. रजांत इंद्रियचलन. तमांत इंद्रियचलन नाही व बुद्धिप्रकाशहि नाही.

आता हें व्याख्यान प्रतिपूर्ण आहे. प्रतिपूर्ण=पुढे सांख्याला हितावह गोष्टींचा समावेश करावयाचा आहे. कालचे त्रिगुण हे विरोधी आहेत असें सांगितलें. यावरून सांख्यांत विरोधमताचा अंगिकार नाही. विरोधी मत कोणालाच मान्य नसतें. आस्तिक नास्तिकालासुद्धा विरोध स्वीका-रल्यापासून अनिष्ट आहे. विरोधाचा अंगिकार केल्यास भाव अभाव एकाच काळीं असण्याचा संभव येईल. कशाहीपासून कांहीहि उत्पन्न होईल व अनवस्था प्रसंग येईल. यद्यपि आपल्याकडे शद्बप्रमाणेकनिष्ठ

म्हणजे श्रुतिची व्यवस्था लावावयाचीच इच्छा असल्यामुळे कांहींनी जीवाच्या भेदाचा व अभेदाचा अंगिकार केला आहे. हे दोन्ही वास्तविक आहे, असो. अंगिकार केला आहे म्हणजे या दोन्ही विरोधी भावाचा अंगिकार केला आहे. ते रामानुज, भास्कराचार्य, भिक्षु–भिक्षुची सांख्यमतांत गती आहे पण वेदांतमतांत गती नाही. (यावाचून) श्रुतिची व्यवस्था लावतां येत नाही असे यांना वाटतें. आपल्याकडील भक्तिमार्गी, माध्वद्वैती व शंकराचार्यद्वैती सोडून सर्वच अशा गोंधळांत पडले आहेत. ही दोन विरोधी मतें आहेत. माध्व जीवेश्वर भेद वास्तविक मानतात. रामानुज तीन पदार्थ मानतात. ईश्वर, चित्, अचित्. जीवचित्-दृष्टीने–भेदाभेद सांगण्याला श्रुतिप्रमाण आहे. "भोक्ता भोग्य प्रेरिता–" श्रुति ईश्वर, जीव, जड यांचे ठिकाणीं ब्रम्हत्व एक पण भिन्नत्व मानतात. जड पदार्थांत सत्ता आहे.

जीवांत सत्ता व चित् आणि परमेश्वरांत सत्, चित्, आनंद. **वल्लभाचार्यांचें मत** विष्णुस्वामींनी प्रकट केलें असें म्हणतात, तें चूक आहे. यांचें मत शंकराचार्याप्रमाणे होतें. श्रीधरी टीकेंत (भा. प्र. स्क) विष्णुस्वामीचे श्लोक घेतले आहेत. ते आचार्यासारखेच आहेत. **दुसरें निंबार्कमत** आहे. त्यांचें द्वैताद्वैत मत आहे. तें द्वैत वास्तविक मानतात. अद्वैत औपचारिक मानतात. हें अद्वैत मत जसें एखादा लोभी मनुष्य मिळाला तर आपण त्याला तुम्ही जसें आहां तसें आम्ही असें औपचारिक सांगतो त्याप्रमाणे आहे. या सर्वांनी ब्रम्हसूत्रावर भाष्य केलें आहे. **भिक्षु** यांचें मत गोलगोल आहे. हा अद्वैतमती आहे. विप्रलिप्सेमुळे किंवा काय पण घोटाळा आहे. एक ब्रम्ह, उपाधीमुळे जीव. ब्रम्ह अधिष्ठान. जीवाचा ब्रम्हाशीं उपाधीमुळे भेद व जीव ब्रम्हच असल्यामुळे अभेद. जीवाची उपाधी सत्य मानतो (कोणत्याहि वेळेस) पण ब्रम्हपणाची स्मृति झालीं म्हणजे उपाधीचा परिणाम अभिमान निवृत्त होऊन काटचाप्रमाणे दूर पडतो व याप्रमाणे मोक्ष मानतो. (ब्रम्हसूत्रभाष्यांत). सांख्य भाष्यांत तो उपाधि सत्य मानणारे मूर्ख असें म्हणतो. (ईश्वराविश्वरत्वादि विमूढायत्र ........). तो जलांत नौका, तशी ब्रम्हावर उपाधि आहे असें

मानतो. ब्रम्हसूत्रांत प्रतिपादन केलेलें मत्त सांख्यापेक्षा श्रेष्ठ आहे असें म्हटलें आहे. सांख्यभाष्य झाल्यावर ब्रम्हसूत्र भाष्य केलें आहे. याचें ज्ञान अगाध आहे. लिहिणें युक्तिबाज असतें. हे भिक्षु एवं भेदाभेदवादी आहेत. रामानुजादि वैष्णव आहेत. हे सगळे विशिष्टाद्वैतांत समावेश. चैतन्य संप्रदायांत रूपासनाचार्य भगवान कृष्णचैतन्य हा कृष्णाचा अवतार होता. कृष्णचैतन्य ईश्वर आहे असें निरूपण भविष्य पुराणांत केलें आहे. याचें चरित्र सामान्य लोकांनी लिहिलें नाही. यांच्या अंगांतून भयंकर प्रकाश निघून स्वर्गांत जात असे. हे फार प्रेमी होते. हे कीर्तनांत उभे राहिले असतां एखादा अप्रेमी मनुष्य कीर्तनांत राहिल्यास त्याचेहि डोळयांस पाणी येत असे. या पंथांतील भक्तीचा संप्रदाय फार उत्तम आहे. **चैतन्य चरितामृत ग्रंथ**–गीतेवर टीका करीत असतांना एक गृहस्थ हात जोडून म्हणाला ! महाराज, आपण टीका केल्यावर आमच्या टीकेकडे कोण पाहणार ? असें ऐकून ग्रंथ करणें सोडून दिले. श्री तुकाराम महाराज चैतन्यसंप्रदायी होते, पण शुद्धाद्वैती होते. यावरून ते याच चैतन्यसंप्रदा-यांतलें होते किंवा काय सांगतां येत नाही. रूपसनातनाचार्यांनी भागवता-वर टीका केली आहे. केवळ भक्तिविषयी विचार केला आहे. ज्ञानाविषयी नाही. यांचे उज्ज्वलनिलमणी आदि ग्रंथ उत्तम आहे. ते आतून कृष्णरूप व बाहेर राधिकारूप होते. हा भेदाभेद अचिंत्तनीय आहे मानतो, तरी विशिष्टाद्वैतासारखेंच मत्त आहे तरी अद्वैत मानतो. भेद, पण वस्तुत: अभेद. भेदप्रत्त्यायक, वस्तुत: आकाशांत मेघ आले म्हटल्यावरून आपण आहो त्या आकाशाहून निराळचा आकाशाची कल्पना करून भेद ग्रहण करितो. हा परमेश्वराला नित्य साकार मानतो. जगत् अनिर्वचनीय मानतो. देवाला नैवेद्य दाखविल्यापासून आपल्यास आनंद होतो. यावरून आपला व देवाचा अभेद आहे असें सिद्ध केलें आहे.

शैवांतील शिवकंठ विशिष्ठद्वैती आहेत. ब्रह्मनिर्विशेष नाही असें मानतो म्हणजे सविशेष मानतो, म्हणजे सर्वशक्तिमत्व, सर्वज्ञत्व, सर्व-कर्तृत्व हे गुण नित्य आहे असे मानतो. तोहि जीवाचा व ईश्वराचा अभेद मानतो. जीव ईश्वरांत मिळून जातो असें म्हणतो.

**अपय्या दिक्षितांनी** श्री कंठभाष्याचा अद्वैतपर अर्थ केला आहे. (तो ओढून ताणून केला आहे.) **विज्ञान भिक्षु** निर्गुण वैष्णव आहेत. श्रीकंठ शैवांत आहे. (यांतील पुष्कळ अनुकूल आहेत) कोठे कोठे श्रीशंकराचार्यहि या मताला अनुसरले आहेत. 'सत्यपि भेदापगमे...' तसेच देव्यापराधक्षमापनयांत आचार्यांचे असे उद्गार कां निघाले याचें शांकरमतीहि उत्तर देऊं शकत नाही. शंकराचार्यांनी समुद्राला मोठेपणा व तरंगाला लहानपणा दिला पण जसा पहिल्या दिव्यांत व दुसऱ्या दिव्यांत फरक नाही तसा जीवांत व ब्रम्हांत कांही भेद नाही. जीव बद्ध होऊन मुक्त व ईश्वर सदा मुक्त एवढाच भेद. जीव ईश्वरासारखाच व्यापक. मी ईश्वराचें शरीर अनध्यस्त विवर्त मानतो. आचार्यांच्या म्हणण्यांत ईश्वर व्यापक व जीव अव्यापक ठरतो. पण माझ्या मनांत जीव ईश्वरच होतो. पण मुक्त झाल्यावर ईश्वरांत मिळून जातो.

सांख्य अद्वैतमताचें अनुकरण करितें. आता अशा प्रकारचीं मतें श्रुत्यनुसार झालीं. नास्तिक मत असें आहे. भेदाभेद विरोधांगिकार आहे. माझ्या मतांत नाही. **जैनाच्या** मतांत आहे. हे जैनाच्या व्यवस्थापवाद मंजरींत सिद्ध केलें आहे. जैन सर्व वस्तु विरोधी आहेत, अविरोधी नाहीत असें मानतात. जैनांत विरोधांगिकार नाही. आपल्यास दिसणाऱ्या विरोधाचा त्यांनी अभ्युपगम केला आहे. **दुसर संशयवादी** आहेत. संशयाच्या विरोधी निश्चय आहे. विरोधांगिकार मानणें इष्ट नाही. विरोधांगिकार कोणालाच इष्ट नाही, तसा नास्तिकालाहि नाही.

**प्रश्नः**— जडापासून चैतन्य उत्पन्न होत असल्यास चैतन्यापासून जड काढ ? भेदाभेदवाद्यांनी जर विरोधांगिकार स्वीकारला तर भेदच किंवा अभेदच ग्रहण कां करीत नाही, म्हणजे विरोधी आवडत नाही ? तसें सांख्यांत परस्पर गुण विरोधी मानून अर्थ मानला आहे तर हे गुण विरोधी नाहीत. विरोधी म्हणजे परस्परनाशक. सामान्यदर्शेत विरोधी पदार्थ भासत नाही. विशेषदर्शेत विरोधी भासतात. जसें झाड मंथन केल्यानें अग्नि उत्पन्न होतो व झाडांत पाणी आहे, पण सामान्यदर्शेत असल्यामुळें विरोधी नाहीत. तीन्ही गुणांचे ठिकाणीं एक जडत्व धर्म घेतला आहे.. या

त्रिगुणांचा अतिविरोध घेतला नाही. एक गुण कमी झाला तर दुसरा उत्कर्ष पावतो. सत्व गुणाचे ज्ञानाशीं अज्ञानाचा मोठासा विरोध नाही, कारण दोन्ही जड म्हणून सांख्यांत विरोधांगिकार नाही. येथे भाष्य चुकलें आहे. वेदान्तांत विरोधाचा स्वीकार नाही. यांत एक सत्य, एक मिथ्या धरला म्हणजे झालें. ते एके ठिकाणीं राहूं शकतात. या त्रिगुणांचे ठिकाणीं जो पुरुष त्याचा या गुणाशीं अविवेक होतो. कालचे गुण सर्व जड. विषय होते, विषय नाहीत हे जाणणारा पुरुष दोन प्रकारचा. **एक** कधीच अविवेक न पावलेला व **दुसरा** प्रकृतींत आलेला (जीव).

पुरुष हा प्रकृतींत येऊन प्रकृतीच्या गुणांचा भोग करतो. या पुरुषाला चांगला वाईट जन्म होण्याला गुण संच कारण आहे. तमोगुण अधिक असल्यास तो वाईट जन्मांत जातो. सत्वगुण अधिक झाल्यास चांगला जन्म येतो. दुसरा पुरुषहि याच देहांत उपद्रष्ट्रा (हा पुरुष प्रकृतींत न आलेला) भर्ता, भोक्ता (प्रकृतींत असलेलें चैतन्य) हें चैतन्य प्रकृतिपासून सुटलें की त्यांत्त मिळून जातें. भोक्तापदावरून तोच जीव होऊन भोग करतो हें सुचविलें. उपाधिमुळे ते धर्म (सत्, चित्, आनंद) झांकून गेले आहेत. वैद्य ईश्वराला जड मानतात, व जीवाला चैतन्य मानतात. चैतन्यमान जीवाला सर्वगत मानत नाहीत; पण हा अतिच मूर्खपणा. कांही वैद्य वेदांतानुसारी आहेत. चरकांनी चेतन धातु मानली आहे. सुश्रुत म्हणतो अनीश्वरवादी मायबाप असले तर गर्भ मूढ होतो. हें मत धन्वंतरीचें आहे असें तो म्हणतो. "स्वभावं ईश्वरकाल. . ."

ईश्वर उष्णतारूपाने प्रगट आहे असें धन्वंतरीहि म्हणतात. कदाचित् उष्णता उपहित चेतन ईश्वर असा अर्थ होऊं शकतो पण प्रकृतीचा भेद मानित्त असल्यामुळे ते ईश्वर जड मानतात.

अविवेक्यादि: सिद्धस्त्रैगुण्यात् तद्विपर्ययाभावात् ।
कारणगुणात्मकत्वात् कार्यस्यव्यक्तमपि सिद्धम् ॥ १४॥

कारिकेवरील टीकेप्रमाणेच याचा अर्थ. सोपी असल्यामुळे व पुष्कळसा भाग मागे झालेल्या कारिकेंत आल्यामुळे नुसता टीकेवरूनच अर्थ सांगून दिला.

भेदानां. परिमाणात्समन्वयाच्छक्तितः प्रवृत्तेश्च ।
कारणकार्यविभागादविभागाद्वैश्वरुपस्य ॥ १५॥

भेदानां संबंधी षष्ठी. परिमाणं=मानं, समन्वयात्=सम्यक् अन्वयः कूटतः प्राप्तः (दुसऱ्या ठिकाणीं जात नसलेलें.) प्रवृत्तेश्च=प्रवृत्तिमुळे. चकारो भेद समुच्चयार्थ. मागच्या कारिकेंत अव्यक्ताचें सामान्य अनुमान सांगितलें.

**प्रश्नः**– असें जें तुमचे प्रधान त्याची उपलब्धि कां नाही. ? जें लोकांत दिसत नाही तें नाही म्हणणें खोटें आहे. कशावरून ? जें दिसत नाही तें असतेंहि या नियमावरून अव्यक्त आहे. भेदांचा आपल्यास परिमाण दिसतो (सत्कार्यवाद घेतात) कुंभार परिमित मृत्तिकेनें परिमित घट करितो. वाटेल तेवढी माती घेऊन वाटेल तितके घट करीत नाही. ज्याअर्थी परिमित काम होतें, त्याअर्थी परिमापक कोणीतरी पाहिजे. परिमित घट झाल्यावर सर्वच माती संपून गेली असें म्हणतां येत नाही. सगळेंच कारण जर कार्यात्मक घेतलें तर कार्य केव्हातरी नाश पावणारच, तर कारणांत मिळालें पाहिजें. जेवढें कार्य आहे तेवढें मोडून पुनः कारणांत मिळून जातें. हा कारणाचा परिमाण कार्यावरून मानतात. जेवढें कार्य तेवढेंच कारण आहे, असें मानल्यास कार्य झाल्यावर कारणच राहणार नाही व कार्यांत बदल होऊं नये कारण बदल कोण करील. म्हणून कारण-शक्ति कार्यापेक्षा जास्त असलीच पाहिजे; म्हणून कार्य कारणाच्या एकदेशीय असतें. ज्याअर्थी भेदांचा परिमाण दिसतो त्याअर्थी परिमित कार्य होतें. या परिमित कार्याला कारण ती प्रकृति. कार्य परिमित नाही तर मग एक बुद्धि एक अहंकार, पंच तन्मात्रा वगैरे इतकेंच कां व्हावें ? दोन बुद्ध्या, वगैरे कां होऊं नये. परिमितच तत्वें कां झालीं ? भेद निरनिराळे आहेत. (पशू, पक्षी, वगैरे)

अलीकडील जड शास्त्रवादी यांच्यांत व आपल्यांत फरक आहे. तो असा:– हें कार्यावरून कांहीतरी कारण आहे असें जाणून कार्याला न सोडतां प्रयत्न करीत असतात. आपल्याकडे कारणावरून कार्याचें अनुमान करून कारण सापडल्याबरोबर कार्य सोडून देतात. याप्रमाणे या लोकांनी

जगाचें कारण पहिलें परमाणु ठरविलें. परंतु कारणाचा शोध करीत राहिलें नाही, तर पुन: कार्यावर आलेत. ते म्हणतात (उत्क्रांतवादी) हें जें जग कार्य आहे तें उत्क्रांति होत चाललें आहे. तें अजूनहि त्याची उत्क्रांति होतच आहे. कारणांतील सर्व शक्तीचा अजून विकास झाला नाही. उत्क्रांति म्हणजे कारण जें एक वाटत होतें त्यांत पुष्कळ शक्तीचा समावेश असून तेवढ्याहि शक्तीचा आविर्भाव होणें. क्रमाक्रमाने ते कारण आपल्या सर्व शक्तीचा आविर्भाव करील. सर्वांना पांच इंद्रियें कां ? सहा कां नाहीत ? इत्यादि प्रश्न पुढे येतात. ते म्हणतील ज्या ज्या जातीस जेवढे लागते तेवढ्याच कारणशक्तीचा विकास होतो व म्हणतील एवढें अमुकच कारण विकास पावावें, असा नियम आहे ही ईष्टापत्ति आहे; कारण कार्य परिमित ठरते. तें म्हणतील तुम्हांस तुमचा ईश्वर सर्व शक्तिमान कसा आहे असें म्हटल्यास तुम्ही काय म्हणाल ? आहे म्हणून आहे असेंच म्हणाल ना ? असें तें आपणांस म्हणतील, पण आपण असें जरी म्हणूं तरी आमच्या सिद्धांतास बाध येत नाही. बोलण्यांत व्याघात नसावा. ब्रह्म जें आहे तें तसे आहे म्हणून म्हणतो. तुम्ही जगाचें कारण घेऊन कसें आहे म्हटल्यास तसेंच आहे म्हणतां. कारणाची उत्क्रांति मानल्यास त्या कारणाचें केव्हा तरी खुंटणें होईल. कारण कार्य होतांना तें बदलतें म्हणून. उत्क्रांति होता होता सर्व कारण विकास पावल्यास कारण नाहीसें होऊन उत्क्रांति बंद होऊन जगत नित्य राहील. तर अनित्यापासून उत्पन्न झालेली वस्तु नित्य राहणें शक्य नाही. विरोधापासून विरोधोत्पत्ति मानल्यास उत्क्रांतिपासून उत्क्रांति होत नाही असें म्हणतां येईल. जग नित्य राहिल्यास कार्यांत कांहीच बदल न झाला पाहिजे.

Spencer म्हणतो स्तुतिप्रियता हा गुण मोठ्या तत्त्ववेत्त्यांचे ठिकाणीं दिसतो. प्रत्येक जण आपल्या मताप्रमाणे मतें स्थापितो. उत्क्रांति वाढत जाते तशी बुद्धिमत्ता वाढत जाते म्हणजे काय ? (याचा अर्थ असा की, बुद्धि ही मेंदूवर अवलंबून आहे व जशी जशी उत्क्रांति होत जाते तसे तसे मनुष्य बुद्धिमान होतात व त्यांचे मेंदू मोठे होत जातात) अशा प्रकारें उत्क्रांति खंडण. उत्क्रांति खुंटणार नाही, कार्य झालेलें आहे; तर

मग पुढे होणाऱ्या कार्याचें हें कारण होईल तर पहिलें झालेल्या कारणाचें कारण पाहिजें—येणेंकरून अनवस्था.

याप्रमाणे भेदाच्या परिमाणावरून एकच प्रधान आहे असें दिसतें.

---

॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# २८

मागे ईश्वरदत्ताने या सगळ्या कार्याला कांहीतरी कारण असलें पाहिजें व तें कारण कार्य झाल्यावरहि असलें पाहिजें व कार्याचा लय झाल्यावर पुन: तें कारणांत मिळून गेलें पाहिजें असें अनुमानाने सांगितलें. समर्थ पहिले सर्व तंत्र सिद्धांत सांगून नंतर प्रतितंत्र सिद्धांत सांगतात. उदाहरणार्थ:–धूम असतो तेथे अग्नि असतो व जेथे धूम नसतो तेथे अग्नि राहात नाही. अमुक गोष्ट असली तर अमुक असली पाहिजे व अमुक गोष्ट नसली तर अमुक नसली पाहिजे. असें अन्वय व्यतिरेकाने सिद्ध होतें. निरोगी शरीर असल्यास शुक्र शोणित संयोगाने गर्भोत्पत्ति होते, हा अन्वय, व निरोगी नसल्यास गर्भोत्पत्ति होत नाही. हा व्यतिरेक झाला. कार्याला कारण पाहिजें व तें कारण कोणतें हें आता सांगतात. कारण म्हणजे ज्याच्यापासून कांही उत्पन्न होतें त्याला म्हणतात. तें कारण दोन प्रकारचें आहे. एक उपादान कारण व दुसरें निमित्त. घटाला माती हें उपादान कारण असून कुंभार, दंड, चक्र इत्यादि निमित्त कारण आहेत. जे कार्याला उत्पन्न करून कर्यानुगत असतें त्याला उपादान कारण म्हणतात, व जें कार्याविषयी तटस्थ राहून कार्याला उत्पन्न करिते त्याला निमित्त कारण म्हणतात. उपादान कारण तीन प्रकारचें आहे. आरंभक, परिणामी व विवर्त. यापैकी नैय्यायिक आरंभक व परिणामी, सांख्य परिणामी व वेदान्त विवर्त उपादान कारण मानतात. आरंभक उपादान कारणाला समवायी कारण म्हणतात. समवाय म्हणजे ज्याच्यासहित असून कार्य उत्पन्न होतें त्याला समवाय संबंध कारण म्हणतात. तंतुला घेऊनच पट होतो. पुन्हा एक असमवायी कारण मानतात. असमवायी कारणामध्यें तंतुसंयोग पटाला कारण मानतात. दोन खापराच्या कपालाच्या संयोगापासून घट उत्पत्ति मानतात. निमित्त कारणहि ते मानतात. आता तंतु

संयोग जो पटाला कारण मानतात हें चूक आहे. कारण तंतु संयोग पटाला कारण नसून तंतु संयोग म्हणजेच पट. म्हणून असमवायी कारण मानणें व्यर्थ आहे. समवायी कारणांत तंतुमध्ये पटाचा आरंभ होतो व तंतु पुरे झाले म्हणजे पट कार्य उत्पन्न होतें. त्याप्रमाणे जगत जें उत्पन्न होतें तें जगांतील परमाणु एका ठिकाणीं होत होत त्यापासून जगत बनतें; म्हणजे जगांतील परमाणूमध्ये जगाचा आरंभ होतो असें मानतात. हें कारण चुकलें आहे. तंतु समवाय होऊन पट होतो म्हणजे या ठिकाणीं आरंभ पटाचा होतो; म्हणजे एकाशीं एक तंतु मिळतात म्हणजे तंतु तसेच राहून पट मात्र भासतो, म्हणून समवायी कारणांत आरंभ मानणें व्यर्थ आहे.

आता सांख्य परिणामी उपादान कारण मानतात. परिणामी कारण म्हणजे कार्य उत्पन्न झाल्यावर पुन्हा कारणांत न मिळणें. उदा० दुधाचें दही होणें. प्रकृति जगाला परिणामीं उपादान कारण मानल्यास कार्य झाल्यावर तें कारणांत पुन्हा मिळणार नाही व कार्य नित्य होईल. प्रलयांत कारणामध्ये जगत् मिळूं नये म्हणून तें विवर्त उपादान आहे. व असें न मानल्यास सांख्याशींच विरोध येईल. · · · · · कारिका १५.

विवर्त उपादान कारण म्हणजे कारण मुळीच बदलत नसून कार्य भासतें. उदाहरणार्थ– रज्जुसर्प.

भगवान म्हणतात:––

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ गीता ॥ २।२८

अर्थ:– ह्या भूतांचें उत्पत्तिस्थान अव्यक्त असून ते मध्येच भासतात. व पुढे अव्यक्तांतच जाऊन मिळतात. म्हणून तूं या विषयी शोक करूं नको.

अव्यक्ताद्व्यक्तय: सर्वा: प्रभवंत्यहरागमे ।
रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ गीता ॥ ८।१८
भूतग्राम: स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवश: पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ गीता ॥ ८।१९

भगवान म्हणतात, " अर्जुना ! हें जगत् ब्रम्हदेवाच्या दिवसांमध्ये अव्यक्तापासून उत्पन्न होऊन ब्रम्हदेवाच्या रात्रीमध्ये अव्यक्तांत मिळून जातें. म्हणून विवर्त उपादान कारण मानणें चागलें आहे. "

( अपूर्ण )

॥ श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

।। श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ।।

# २९

## योग वासिष्ठतत्व

प्रणामामि परंब्रम्ह कृष्ण शंकर संज्ञितम् ।
ज्ञानेश्वर स्वरूपंयत् हृदब्जमधितिष्ठति ।।१।।

आज मी तुला वासिष्ठांतील सिद्धांत व तो ग्रंथ वाचून मी जे कांही सिद्धांत काढले आहेत ते सर्व सांगणार आहे. तुला ठाऊक आहे की, लहान मुलाला जेऊं घालतांना आई एका मोठ्या घासाचे दोन घास करून देते व तोच मोठा झाल्यावर मग त्याच दोन लहान घासांचा एक मोठा घास करून देते. आपल्या एवढा घास कांही मुलांस चालत नाही, म्हणून जेवढ्या अन्नाचे आपण आपले घास करितो, तेवढ्याच अन्नाचे लहान मुलांकरिता लहान लहान असे पुष्कळ घास करितो. त्याप्रमाणे मूर्खांना समजण्याकरिता वेदांतांत एका गोष्टीच्या दोन, तीन गोष्टी करून सांगितल्या आहेत. श्रीमत् शंकराचार्य म्हणतात:——

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
ब्रम्हसत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रम्हैव नापरः ।।

वेदांतांत दोन गोष्टी समजावयाच्या असतात. (१) ब्रम्ह सत्य असून जगत् मिथ्या आहे. (२) जीव हा ब्रम्हच आहे. याप्रमाणे सत्य आणि मिथ्या या दोनच गोष्टी वेदांतांत समजावयाच्या असतात. पण कांही माणसांनी या दोन गोष्टींच्या तीन गोष्टी करून सांगितल्या.

**प्रश्नः**–लहान मुलें गंजिफा खेळतात; तो तुला खरा वाटतो की खोटा वाटतो ?

**उत्तरः**—खोटा वाटतो, पण तोच खेळ पैसे लावून खेळल्यास आपण मुलांना खेळूं देणार नाही. याचें कारण काय ? तर त्याला आपण वाईट समजतो. त्या खेळाला आपण सत्य स्वरूप देतो. त्याला आपण जुवा म्हणतो. रोज आपणांला नानातऱ्हेचें स्वप्न दिसतात. पण त्याबद्दल आपण कांहीच काळजी करीत नाही. ते सर्व खोटें समजतो. पण रोज रोज एकच स्वप्न दिसूं लागलें तर आपण चिंता करतो. व त्याबद्दल कांही उपायहि करितो. याप्रमाणे लोक जगांत कांही गोष्टी उपयोगी समजतात व कांही उपयोगी समजत नाही. उदा० पूर्वी अशी चाल होती की, पतीची तसबीर काढून पत्नि पाहात असे व पत्नीची तसबीर काढून पति पाहात असे, आणि दोघानांहि परस्परांचें स्वरूप पसंत पडल्यास त्यांचा विवाह होत असे. यांत त्या तसबीरींचा उपयोग होतो, पण त्याच तसबीरी भिंतीवर काढल्यास कांहीच उपयोग होत नाही. पहिल्या तसबीरींचा उपयोग वाटत असल्यामुळे त्या खऱ्या भासतात व दुसरी भिंतीवरील चित्रें निरुपयोगी वाटत असल्यामुळे खोटी भासतात. पहिली तसबीर उपयोगामुळे खरी वाटावयास लागली व दुसरें भिंतीवरील चित्रें उपयोगी नसल्यामुळे खोटी वाटावयास लागली. मृगजळ घरांतून पाण्यासारखें दिसतें व तें आपण खोटें समजतो, पण त्याच्याकडे एखादें मूल जाऊं लागलें तर त्याला झळ लागेल म्हणून त्याला बाहेर जाऊं देत नाही. म्हणजे येथे तेंच मृगजळ खरें वाटलें. रोज स्वप्नांत जर एखादें भूत दिसूं लागलें तर त्या भितीनें तूं रोड होत जाशील व तें न दिसण्याकरिता उपाय करशील. कारण तें दुःखदायक आहे म्हणून. पण तोच रोज जर एखादा देव दिसूं लागला तर तो सुखहेतु असल्यामुळे नेहमीच दिसावासा वाटेल. पण तेंच भिंतीवर देवाचें किंवा भूताचें चित्र काढल्यास कांहीच वाटणार नाही. याप्रमाणे खोटया वस्तूंत दोन प्रकार झाले. जी वस्तू खोटी असून उपयोगी आहे असें वाटतें व खोटी असूनहि सुखदुःख देणारी आहे असें वाटतें, ती एक व जिचा कांहीच उपयोग नसून ती कांहीच करणारी नसते, ती दुसरी. अशा दोन प्रकारच्या खोटया वस्तू झाल्या. एखादें मातीचें वाघाचें चित्र वगैरे काढलें तर तूं भीत नाहीस पण तेंच चित्र पाहून मुलाला भिती

वाटते. कारण तूं तें खोटें समजतेस व मूल खरें समजतें. तुला तें अगदीच खोटें वाटत असल्यामुळे त्याबद्दल तुझी आवडीहि नसते व तें नाहीसें व्हावें असेंही तुला वाटत नाही. तर त्याबद्दल तुझी उपेक्षा असते पण याच गोष्टी खऱ्या वाटल्यास आपण त्या खोटया वस्तूवर राग किंवा द्वेष करितो. याचप्रमाणे वेदांतांत वेदांती जगताचे दोन भाग करतात.

**(१) व्यावहारिक सत्य वस्तु व (२) प्रातिभासिक सत्य वस्तु.**

आपण मुलीला मातीची भुलाई करून देतो. तिचा आपणांस कांहीच उपयोग नसतो व ती आपल्यास खोटी वाटते. पण तीच मातीची भुलाई आपण माडी पौर्णिमेच्या दिवशी देवी समजून उपयोगांत आणतो. तिची आपण पूजा करितो व ती मोडल्यास अपशकून समजतो. माडी पौर्णिमेच्या दिवशी भुलाईच्या ठिकाणीं देवी बुद्धि असल्यामुळे ती खरी वाटते व मुलीस खेळावयासाठी करून दिलेल्या भुलाईचे ठिकाणीं खोटी बुद्धि असल्यामुळे तिला आपण कांहीच समजत नाही. तसाच आखाडपाटीचा खळ. मुलीला खेळ पाठवितांना त्यांत लहान लहान भांडीं असतात, पण तेंच मोठें ताट असल्यास तें जेवणाच्या उपयोगी पडत असल्यामुळें त्याला आपण खरें मानतो, व आखाडपाटींतील खेळाचीं ताटें वगैरे भांडीं खोटीं समजतो. त्याचप्रमाणें मापूल हे दीठ (दृष्ट) काढण्याच्या उपयोगी असल्यास खरें समजतो. नाहीतर त्याची उपेक्षा करितो. याचप्रमाणे जगांतील सर्व पदार्थांविषयी समजावें. या संसारांतील सर्व पदार्थ रज्जुसर्प किंवा स्वप्नाप्रमाणें मिथ्या आहेत. जी वस्तु सत्य असते, ती नेहमी (तीन्ही काळीं) राहते, तिचा कधीहि नाश होत नाही. संसारांतील वस्तु धरून ठेवण्याची आपण कीतिहि खटपट केली तर त्या नित्य राहणें शक्यच नाही. आपण संसार धरून ठेविला तरी तो आपल्यापासून दूर पळतो. हा संसार इतका असत्य असूनहि त्यांत आपण व्यवहार करितो म्हणून त्याला व्यावहारिक सत्ता आहे. रज्जुसर्प किंवा स्वप्न अगदीच खोटें असल्यामुळे त्याची प्रातिभासिक सत्ता आहे. या दोन वस्तु झाल्या. (१) **ब्रम्ह** तें अगदी सत्य आहे व **दुसरा** संसार. त्यांत कांही गोष्टी अगदीच खोटया आहेत व कांही खोटया असूनहि त्या खऱ्या समजून आपण त्यांच्याशीं व्यवहार

करितो. या सर्वांहून सत्य असें एक ब्रह्मच आहे. **यालाच दृष्टिसृष्टिवाद म्हणतात.** या वादांत अनेक ग्रंथ आहेत. मातीची भुलाई मुलींना खरी वाटते. तुम्हांला वाटत नाही. पण तीच माडी पौर्णिमेच्या दिवशीं खरी मानून तुम्ही तिची पूजा करतां. मुलगी मोठी झाल्यावर भुलाई खेळूं लागली तर आपण तिला रोखतो; व म्हणतो की, आता तूं भुलाई कशाला खेळतेस ? स्वयंपाक वगैरे करणें व इतर घरांतील कामें शीक. हे सर्व व्यर्थ आहे. त्याप्रमाणे वेदांतांत ज्यांची थोडीशी प्रगती झाली आहे, त्यांना संसारांतल्या पदार्थांत दोन भेद आहेत, हें कशाला सांगितलें पाहिजे ? लहान मुलाला आपण लहान लहान घास करून खाऊं घालतो. मोठ्या मुलाला त्या लहान घासांचा मोठा घास करून देतो. त्याप्रमाणे मूर्ख मनुष्याकरिता संसारांतील पदार्थांचे भेद केले आहेत. वास्तविक नाही. सिद्धांत मुक्तावलीकार म्हणतात:– वस्तुत: दोनच गोष्टीं आहेत:– १ ब्रह्म व २ री जगत्. जगत मिथ्या असल्यामुळे त्याचा त्याग करावयाचा व ब्रह्म सत्य असल्यामुळे तदाकारवृत्ति करावयाची. यालाच दृष्टिसृष्टिवाद म्हणतात. दुसऱ्या मतांत म्हणजे सृष्टिदृष्टिवादांत पुष्कळ ग्रंथ आहेत. पण या मतांत हाच मुख्य ग्रंथ आहे. या वसिष्ठाची प्रक्रिया अशी आहे:– जगतांत तीनच पदार्थ आहेत:– १ देह, २ मन व ३ आत्मा. यापैकी देह तुच्छ, घाणरेडा, जड, मेल्यावर कांही उपयोग नाही, कुत्र्यांनी खाल्यास विष्ठा होते असा असल्यामुळे त्याचा विचार कर्तव्य नाही. **आत्मा** सर्वव्यापक आहे. सर्व विचारांचें फळ व सर्व विचार झाल्यावर जें उरतें तेंच तो आहे. एखाद्या गावास जावयाचें असल्यास ज्या गावाहून जावयाचें. त्या गावाचा विचार कर्तव्य नसतो व ज्या गांवाला जावयाचें त्याहि गावाचा विचार कर्तव्य नसतो. कारण त्या गावाला पोंचल्यावर समजतेच आहे. पण ज्या मार्गानें जावयाचें त्या मार्गाचा मात्र गावास पोंचेपर्यंत विचार केला पाहिजे. त्याप्रमाणे देह व्यर्थ असल्यामुळे त्याचाहि विचार करणें ठीक नाही. आत्मा सर्व विचारांचें फळ असल्यामुळे त्याचाहि विचार करण्याची जरूर नाही. पण देह व आत्मा यामधील चित्ताचा विचार कर्तव्य आहे. ओल्या मातीचीं जशीं नानाप्रकारचीं भांडीं करितां

येतात, सुक्या मातीचीं किंवा भाजलेल्या मातीचीं कांहीच होऊं शकत नाही, त्याप्रमाणे मनच सर्व बंधनांचें कारण आहे व त्या बंधनापासून सुटण्याचेंहि कारण तेंच आहे. हें मन दोन प्रकारचें आहे:– शुद्ध व अशुद्ध. उदा० नदींत ओंगळ पाणी असलें तर तेंच गाळून टाकल्यास शुद्ध होतें. त्याप्रमाणे मन देहाशीं चिटकून असतें तेव्हा अशुद्ध असतें व देहाहून निघून आत्म्याकडे लागलें म्हणजे शुद्ध होतें. अमृतबिंदूंत यांचा चांगला विचार केला आहे. अशुद्ध मनाचा परित्याग करून शुद्ध मनाची वृद्धि करण्याकरिता तुला आज वासिष्ठ सांगतो. हा सर्व अर्थ ध्वनीनें या श्लोकांत सांगितला आहे. "अहं बद्धो विमुक्त...."

ज्याला घरीं खावयाला आहे त्याला भिक्षा मागण्याची जरूर नाही व जो उपवास करतो त्यालाहि भिक्षा मागण्याची जरूर नाही. पण ज्याला भूक लागते व खावयालाहि मिळत नाही त्याला भिक्षेचा उपयोग असतो. लहान मुलीला संसार कसा करावा हें शिकविण्याची गरज नाही. त्याचा म्हातारीलाहि उपयोग नाही, पण जी मुलगी उपवर झाली, तिला त्याचा उपयोग असतो. त्याप्रमाणे जो बद्ध आहे त्याचें मन देहाशीं फारच चिटकलें असल्यामुळे त्याला या शास्त्राचा उपयोग नाही. किंवा जो पूर्ण आहे त्यालाहि यापासून उपयोग नाही, कारण, त्याच्या विचाराची समाप्ति होऊन एक आत्माच सत्य असून तो सर्व व्यापक आहे, असें त्याला कळून चुकलें असतें. पण ज्याला संसारांत दु:ख वाटतें, म्हणजे ज्याला मन चांगलें समजूं शकतें, ज्याला दु:ख नको आहे, आत्मा जाणण्याची इच्छा आहे, तो या शास्त्राचा अधिकारी आहे. या सर्व निरूपणाचें रहस्य हें आहे की ज्यांना संसारांत दु:ख नसून मनोरंजनाकरिताच जे वेदांत पाहतात, त्यांना या शास्त्रापासून कांहीच फायदा होत नाही. आज चार विषय सांगितले आहेत:– (१) संसारांत दोन प्रकारचे खोटे पदार्थ आहेत (२) आधी मनाचा विचार केला पाहिजे (३) वेदांतांतील दोन वाद व (४) या शास्त्राचा अधिकारी. मोक्षाचा व अधिकाऱ्याचा प्राप्यप्रापकभाव संबंध आहे. जीव–ब्रह्मैक्य हा विषय असून त्रिविध दु:खनिवृत्ति व अखंड परमानंद प्राप्ती हें फळ अथवा प्रयोजन आहे. (यांत सुतीक्ष्णाची

कथा व आणखी एक कथा आहे, ती सोडून देतो, कारण त्यांचा येथे उपयोग नाही.)

त्वदर्चन परायण प्रमथ कन्यका लुंठित ।
अलंतट वितर्दिकाशयित सिद्ध सिमंतिनी ।
विकीर्ण सुमनो मनो रमण मेरुणा मेरुणा ।।

मेरू पर्वताच्या पायथ्याशीं अप्सरांचें क्रीडास्थान आहे. अप्सरा म्हणजे देव किंवा गंधर्व स्त्रिया. त्या स्वेच्छाचारी असतात. म्हणजे कोणाहि बरोबर विहार करतात, तरी त्यांना पातक लागत नाही. उदा० एखाद्या मनुष्याजवळ थोडेसें धन असलें व तो फार खर्च करूं लागला तर लवकर दरिद्री होईल. पण ज्याच्यापाशीं पुष्कळसें धन आहे, त्याने कितीहि खर्च केला तरी काय होतें ? त्याप्रमाणे मनुष्याचें पुण्य थोडें असल्यामुळे त्याचा लवकर क्षय होतो. स्वर्गांतील देवांचें किंवा अप्सरांचें अति पुण्य असल्यामुळे त्यांच्या पुण्याचा क्षय होत नाही. मनुष्यांच्या इच्छा बांधलेल्या असतात. पण देव लोकांच्या इच्छा बांधलेल्या नसतात. त्या पर्वताच्या पायथ्याशीं एक सुरुची नांवाची अप्सरा क्रीडा करीत होती. त्याच मार्गाने एक देवदूत जात होता. तिने त्याला एक हाक मारली व आपलें येणें कोठून झालें व कोठे जाणां असें विचारलें. तेव्हा तो देवदूत म्हणाला, कोणी अरिष्टनेमी नांवाचा राजा आपल्या पुत्राला राज्य देऊन तप करण्याकरिता गेला. त्याने फारच भयंकर तप केलें. तें पाहून इंद्र भ्याला व मला सांगितलें की, तूं त्या राजाकडे जाऊन त्याला स्वर्गांत घेऊन ये. ही आज्ञा घेऊन मी राजाकडे गेलों व त्याला इंद्राचा निरोप सांगितला. तेव्हा त्यानी स्वर्गांतील गुणदोष विचारलें. या कथेच्या संबंधाने मीं तुला एक गोष्ट सांगतो. भरद्वाजाने वाल्मिकी ऋषीला विचारलें, मुने ! पुष्कळ लोक मोक्षाचें साधन कर्म सांगतात. कित्येक उपासना सांगतात व कित्येक तर ज्ञान सांगतात. यापैकी कोणतें खरें साधन आहे, हें कृपाकरून सांगा. वाल्मिकी म्हणालेः—मोक्षाचें साधन यापैकी काय होऊं शकतें हें मी तुला सांगतो. कल्पना कर की, एक बाई होती. तिला एक मुलगा झाला. लहानपणींच तो मुलगा तिच्यापासून दूर झाला. व बराच मोठा झाल्यावर जरी पुनः

तिच्याजवळ आला तरी तिची ओळख पटणार नाही. मंगळागौरीची कथा तुला माहित आहेच. तिचा पति जवळ असून खूण सांगितल्यावाचून ओळख पटली नाही. त्याप्रमाणे आत्मा जवळ असूनहि अज्ञानामुळे त्याचें ज्ञान होत नाही. ज्ञानावाचून त्याची साक्ष पटत नाही. आत्मप्राप्तिकरिता ज्ञानच मुख्य साधन आहे कर्म किंवा उपासना मोक्षाचें साधन होऊं शकत नाही. कोणी म्हणतात:—

उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथाखे पक्षिणां गतिः ।
तथैव ज्ञानकर्माभ्यां जायते परमं पदम् ॥

घोड्यावर बसणारा दोन रिकाबींत पाय ठेविल्याशिवाय जाऊं शकत नाही, त्याप्रमाणे कर्म व ज्ञान हे दोन्ही मोक्षाला साधन आहे असें म्हटलें आहे. या वाक्याचा अर्थ निराळा आहे. भारद्वाजाने विचारले की, या संसारांत दुःखरहित असें कसें वागतां येईल? वाल्मिकी म्हणाले,— भारद्वाजा ! तूं रामाप्रमाणे वाग. जीवन्मुक्तिकरिता कर्म केलें पाहिजें. ज्याप्रमाणे प्रकाशावाचून अंधारांत काम होत नाही, म्हणून पहिले दिव्दाने अंधाराचा नाश करून नंतर काम करतो, त्याप्रमाणे ज्ञानाने अज्ञानाचा नाश करून, नंतर प्रारब्धरूपी वृत्तीचा कर्माने रोध करून ज्ञानाने आपला आनंद भोगावा. ब्रह्मैक्य मात्र ज्ञानाने होतें. मुक्तीला कर्म साधन नाही. कारण तें विरोधी आहे. लहान मुलांना जें दूधदात येतात व ते पुढे पडून जातात व नंतर पुनः दुसरे दांत येतात. पण हे दुसरे दात आल्यावर मात्र दूध पाजत नाहीं. कारण ते पुनः पडून जातात. किंवा लहान मुलांना दूध पाजावयाचें नसल्यास त्याचें तोंडांत बोट घालून चोखावयास लावतात. कारण बोटें चोखून भूक जाते, अशी समजूत असते. पण तरुणपणीं ही समजूत राहात नाही. व तोंडांत बोटें घालून भूकहि जात नाही. त्याप्रमाणे कर्म करतांना मी देह आहे, मी पुण्यकर्ता, मी पापकर्ता इत्यादि कर्तृबुद्धि असते व ज्ञान झाल्यावर मी अकर्ता आहे, अशी बुद्धि असते. या दोन बुद्धि विरोधी आहेत. ज्ञानाला मी कर्ता आहे, अशी बुद्धीच उत्पन्न होत नाही. तरुणपणीं बोटें चोखणें व अन्न हें दोन्ही नको आहेत. नुसतें अन्नच पाहिजें. व लहानपणीं मात्र हे दोन्ही पाहिजेत. त्याप्रमाणे ज्ञान झाल्यावर

कर्माची आवश्यकता नाही, पण लहान मुलांकरिता जसें आपण बोबडे बोलतो, तोतडे बोलतो, मुद्दाम त्याची कांही आवश्यकता नसते, त्याप्रमाणे ज्ञान झाल्यावर लोकांना सन्मार्गाला लावण्याकरिता कर्म करावें लागतें. मूर्खांना कर्माबाचून गतिच नसते. आत्मा हा कर्ता नाही तसाच भोक्ताहि नाही. म्हणून त्याचे ठिकाणीं कर्माचा लेप नाही. मोक्षाला साधन, ज्ञान व कर्म हे दोन्ही आहेत. या म्हणण्याचा दुसरा एक अर्थ असा आहे:—बालपण जाऊन तरुणपण आल्यावर जर एखाद्याने विष्ठा चिवडली तर तो कांही बाळ होणार नाही. किंवा त्याला कोणी बाळ म्हणणार नाही व त्यामुळे दुसऱ्या मुलांना शिक्षण देण्याच्या तो उपयोगाचा राहणार नाही. त्याप्रमाणे कुत्र्यासारखा कसाहि वागणारा ज्ञानी असल्यास त्याची कांही हानी नाही. पण लोक सुधारण्याच्या तो उपयोगी पडत नाही. ज्ञानी अज्ञानाप्रमाणे विषयसेवन करूं लागला तर त्याची कांहीच हानी होत नाही. नाश पावलेलें अज्ञान पुन: उत्पन्न होत नाही. कारण त्याचा उत्पन्न होणें हा स्वभाव नाही. नाश होणें हा स्वभाव आहे.

**प्रश्न:**—अंधाराची उत्पत्ति होऊं शकेल काय ?

**उत्तर:**—दिवा विझवून अंधार करतां येतो. पण दिवा स्वयंप्रकाश नाही. सूर्य विझवून मात्र होत नाही. पण ज्ञानी यथेष्ठाचरण करूं लागला तर दुसऱ्या विचारी अज्ञान लोकांस विषयसेवनाची संवय लागते. तो लोकोपयोगी होत नाही. म्हणून सद्‌गुरु होण्याला पात्र नाही. याकरिता ज्ञान जसें पाहिजें, तसें लोकांना सन्मार्गाला लावण्याला कर्महि पाहिजें. कर्म मोक्षाला हेतु नाही, हें दाखविण्याकरिता या कथेचा आरंभ होता.

अरिष्टनेमी राजानें स्वर्गांतील गुणदोष विचारले, तेव्हा तो दूत म्हणाला, राजा ! अतिपुण्यावाचून स्वर्गांत कोणी येत नाही. अति सुंदर स्त्रिया, पुष्कळ धन व पुष्कळ आयुष्य वाढविणारें अमृत मिळतें. जशी इच्छा असली तशी भोगाची पूर्ति होतें, व या सर्व मनुष्य जातीवर सत्ता असते. हे गुण सांगितले. आता दोष सांगतो:—तेथे अधिक पुण्याने अधिक सुख, मध्यम पुण्याने मध्यम सुख व कनिष्ट पुण्याने कनिष्ट सुख मिळतें. व तें पुण्य संपलें की, मनुष्य पुन: खाली पडतो. स्वर्गांत आपल्याहून जे

श्रेष्ठ व जास्त सुखी असतात त्यांच्याबद्दल द्वेष असतो व जे खाली कमी सुखी असतात त्यांच्याबद्दल हर्ष वाटतो व बरोबरीच्यांत हेवा असतो असें सांगितलें. तेव्हा राजा म्हणाला, दूता ! तूं असत्य बोलतोस. कारण तूं सांगितलेले गुण व दोष एकाच ठिकाणीं राहणें शक्य नाही. तुझा स्वर्ग मृत्युलोकांपेक्षा जास्त दिसत नाही. कारण मृत्युलोकाप्रमाणेच हलक्या लोकांवर सत्ता, बरोबरीच्यांत कलह, मोठ्याबद्दल द्वेष इत्यादि गोष्टी स्वर्गांतहि असतात. दुसरा स्वर्गांत गुण नाही. तूं म्हणतोस की, पुण्याचें फळ स्वर्ग आहे. पण तें चुकीचें आहे. कारण मृत्युलोकांप्रमाणेच तेथे आहे, म्हणून पुण्य विपर्ययानें तो (=स्वर्ग) पापाचेंच फळ आहे असें मला वाटतें. उदाहरणार्थः— प्रथम गोड व नंतर दुःखरूप अशा बचनागाप्रमाणे प्रथम सुखरूप व शेवटीं दुःखरूप असा स्वर्ग पुण्याचें फळ होऊं शकत नाही. तेथील स्त्रिया व तेथील भोग फार सुंदर असतात, हेंहि तुझें म्हणणें चुकीचें आहे. कारण कोणतीच वस्तु सुंदर किंवा कुरूप नाही. जितका जितका वस्तुचा उपयोग जास्त तेवढी तेवढी ती वस्तु जास्त सुंदर व प्रियकर वाटते. सुवर्ण कंकण चांगलें खरें, पण तेंच रणांत लढाई-करिता जातांना हातांत घालून गेल्यास हिजड्याप्रमाणे दिसतें. त्यावेळीं हातांत तरवार वगैरे आयुधें असणें हेंच सौंदर्य आहे. मुलाचें आंग जर उललेलें असलें तर चांगलें दिसत नाही. तें चिकण चोपडेंच पाहिजे. पण रणांत असणाऱ्या मनुष्याचें आंग चिकण चोपडें असून उपयोग नाही. तें सुंदर दिसत नाही. त्याच्या आंगावर तरवारीचे घावच चांगले दिसतात. सौंदर्य ही कल्पना आपल्या मनाच्या आसक्तीवर अवलंबून आहे. तरुणपणांतच जेव्हा कामोत्पत्ति जास्त असते, तेव्हा कुरूप स्त्रीहि सुंदर वाटते. कुत्र्याला कुत्री जशी सुंदर वाटते तशीच इंद्राला इंद्राणी वाटते, म्हणून स्वर्ग पुण्य फळ म्हणतां येत नाही. स्वर्गांत चांगलें धन मिळतें, हेंहि म्हणणें बरोबर नाही. कारण तेथल्या धनाचेंहि मृत्युलोकांतील द्रव्याप्रमाणे रक्षण करावें लागतें. एकाच रसानें रसनेंद्रिय तृप्त होत नाही. तर मग ज्या अमृतांत षड्रस आहेत, तें पिऊन रसनेंद्रिय वाढेल व मधुर रसानें सत्व-गुण वाढेल. मग अप्सरा वगैरेचा कांहीच उपयोग राहणार नाही. मृत्यु

लोकांत एका मनुष्याला तरी पतिव्रता स्त्री मिळण्याचा संभव आहे; परंतु स्वर्गात सर्वच उष्टद्या भोगण्याकरिता मिळतात, मग हें पुण्याचें फळ कसें म्हणतां येईल ? बरें ! स्वर्गांतील स्त्रियांना असें वागूनहि पाप लागत नाही. असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण वेदविरुद्ध कर्म करणें हें पाप आहे. आपल्या स्त्रीचे ठिकाणीं ऋतुकालीं गमन करावें अशी वेदाज्ञा आहे. पण देव झाल्यावर कोणत्याहि स्त्रीचे ठिकाणीं रममाण व्हावें, असें वेदांत कोठेच सांगितलें नाही. देवांना पुष्कळ स्त्रिया रागानेंच मिळतात. म्हणून वेश्या भोग करणें वेदविरुद्ध आहे व म्हणून तें पाप आहे. याकरिता पापरूप स्वर्ग पुण्याचें फळ होऊं शकत नाही. देवदूत म्हणाला, मी ही सर्व हकीकत इंद्राला सांगितली. (वेदाने स्वर्गासाठी यज्ञ करावा, असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ निराळा आहे. कल्पना कर की, एखादा मनुष्य आग लागलेल्या घरांत सापडला आहे व या घरांत जळून मरणार असें त्याला वाटते व त्यावेळीं एखादा शहाणा मनुष्य तेथे येऊन त्याला घरांतून अमक्या वाटेने बाहेर निघ, असें सांगतो, त्याप्रमाणे मूर्ख जे आहेत, त्यांना देहच आत्मा आहे व देह पडल्यावर आत्म्याचाहि नाश होतो, असें वाटते. त्या मूर्खाकरिता श्रुति मातेने स्वर्गाचें वर्णन सांगितलें आहे.)

अरिष्टनेमीचें भाषण ऐकून इंद्राला फार संतोष झाला व त्याने देव दूताला सांगितलें की, तूं या राजाला वाल्मिकी ऋषिकडे घेऊन जा, व त्यांना या राजाला उपदेश करण्याविषयी माझी हात जोडून विनंती सांग. देवदूत म्हणाला, याप्रमाणे इंद्राची आज्ञा घेऊन मी त्या राजाला वाल्मिकी ऋषीकडे घेऊन गेलो व त्यांना इंद्राचा निरोप सांगितला. ते म्हणाले राजा ! एकदा भारद्वाजानें मला ज्ञान विचारलें होतें. तेंच मी तुला सांगतो. हीच कथा पूर्वी वसिष्ठाने रामाला व वाल्मिकीने भारद्वाजाला व वाल्मिकीनें पुन: अरिष्टनेमीला सांगितली, तीच मी तुला सांगतो, असें देवदूत सुरूचीला म्हणाला. या कथेचें तात्पर्य असें आहे:—

कितीहि विचार केला तरी ज्ञान विचाराच्या स्वाधीन आहे व तो विचार उत्पन्न होऊन दृढ होण्याकरिता अंगीं पुण्य पाहिजे. तप पाहिजे.

तपादिक पुण्य कर्म केल्याशिवाय होत नाही. राजाचा मुलगा आहे, एवढे समजल्याबरोबर तो कांही राजाचा अधिकारी होत नाही. त्याला मोठें काम करून तो अधिकार आणून घ्यावा लागतो. त्याप्रमाणे जें खाऊन पिऊन सुखी असतात व ज्यांना संसारांत कांही दुःख वाटत नाही तेहि जेवण झाल्यावर निजतेवेळीं आत्मा देहाहून निराळा आहे असा विचार करतात पण अशा विचाराने ज्ञान होत नाही. जपान देशांत एका कागदावर ईश्वराची प्रार्थना लिहून एका झाडावर बांधून देतात. त्या लोकांची अशी समजूत आहे की, तो कागद त्या मनुष्यातर्फे ईश्वराची प्रार्थना करतो. पण ही सर्व लुच्चेगिरी आहे. आळसामुळे कोणास वेळ सापडतो ? यांतला अर्थ असा आहे:-देहाला कठिण व आत्मा मिळण्याकरिता सुलभ तींच परमार्थाकरिता साधनें समजावीं. विषयामध्ये राहून विषय मिळण्यास सुलभ व आत्मा मिळण्यास कठिण अशीं साधनें करूं नयेत. पतिबरोबर सति जाणें हें साधन देहाच्या दृष्टीने कठिण आहे पण पति मिळण्याच्या कामांत सुलभ आहे. म्हणून योग, तप, कर्म इत्यादिकांच्या योगाने विवेक होण्यास सुलभ जाते. ज्ञान होईल तेव्हा होवो, पण हीं साधनें विवेक उत्पन्न करण्याला सुलभ आहेत. ज्यांना खरोखरच परमार्थ करावयाचा, त्यांनी देहाकडे पाहूं नये. हिंदुस्थानांतील सर्व मार्ग असेच आहेत. तप, योग, कर्म इत्यादि जे मार्ग आहेत, ते वैराग्याला साधन आहे. सत्कर्माच्या सवयीनेच वैराग्य होतें. नेहमी विषयापासून दूर राहण्याची सवय असल्यामुळे थोडक्याशा विषयदोष दर्शनाने वैराग्य होतें. म्हणूनच तीर्थयात्रेनंतर रामाला वैराग्य झालें.

हरिः ॐ तत्सत् श्रीज्ञानेश्वरकृपाप्रसादे महाराष्ट्र भाषायां वासिष्ठतत्वे प्रथमं रहस्यम् । हरिः ॐतत्सत्श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु शुभं भवतु: ।।

---

## ज्ञानेश्वर आई

अरिष्टनेमीला वाल्मिकी म्हणाले:—मी एकांतीं आसनावर बसलो असतां भारद्वाज आले व म्हणाले की, महाराज ! संसारांतून मुक्ति

होईल असें जाणण्याची मी इच्छा करतो. वाल्मिकी म्हणतात:—ठीक आहे. ज्याचें मनन निदिध्यासन केलें असतां तूं कृतकृत्य होशील असें साधन सांगतो. थोडक्यांत योगवासिष्ठाचा सार सांगतात:—

**उपक्रमः**—मागे सांगितलें की, चित्त हें शुद्ध व अशुद्ध असें दोन प्रकारचें आहे. जसें—आपण कपाळावर बिजवरा किंवा कुंकू लावतो व तें वाकडे आहे किंवा सरळ आहे हें आरशाने पाहतो. आरशांत पाहून आपण आपल्याच कपाळावरील कुंकवाची दुरुस्ती करतो. आरशांतील मुखाची दुरुस्ती करीत नाही. कारण आपलें मुख आपल्याला पाहतां येत नाही. आरशांतील मुख आपलें कशावरून? असा आपण संशय घेत नाही. आत्म्याचें कोणत्याहि शास्त्राने ज्ञान होत नाही. व कोणतेंहि शास्त्र आत्म्याचें ज्ञान करून देण्याला समर्थ नाही व उपायहि ज्ञान करून देण्याचा नसतो. आपला डोळा आपणांस दिसत नाही. तसा आत्माहि समजत नाही. परंतु जसें आरशांत प्रतिबिंब पाहतो व तें खोटें आहे असें समजतो, त्याप्रमाणे वासनेमध्ये असलेलें आत्म्याचें प्रतिबिंब पाहून आपण त्याहून निराळें आहो, हें समजलें पाहिजें. तूं आपल्याला वासनेपासून निराळें समजतां येते की नाही हें पहा. उदाहरणार्थ:—घरांत अंधार असतो तेव्हा तो दिव्याने निघून जातो. कां? तर दिवा अंधाराचा वैरी आहे म्हणून. दिव्याच्या प्रकाशाने वर किंवा जमीन नाहीशीं होत नाही. वैरी भेटला म्हणजे नाश पावतो असा विरुद्धाचा नियम आहे. एक राजा जेव्हा दुसऱ्या राजाला मारतो तेव्हा तो त्याचें शस्त्र घेऊन जातो कारण शस्त्र कांही त्याच्या विरुद्ध नाही. बायकांचें भांडण क्रोध निघून गेला म्हणजे बंद पडतें. क्रोध व शांति, रडणें व उगे राहणें हे परस्पर विरुद्ध आहेत. क्रोध येतो जातो तशीच शांतीहि येते जाते. दोन्ही वेळीं तूं असतेस. तूं क्रोधाची किंवा शांतीची वैरी नाहीस. विरोधी पदार्थ आपापसांत नाश पावतात, असा नियम आहे. दोन्ही ठिकाणीं तूं असतेस, पण तूं दोन्ही नव्हेस. क्रोध, शांति इत्यादि वृत्ति परस्पर विरोधी आहेत. तूं दोन्ही नव्हेस. तथापि क्रोधाचे वेळीं दुःख वाटतें, अंधाराने घर प्रकाशित दिसत नाही. प्रकाशाने दिसतें. तशा वासना दोन प्रकारच्या आहेत. मलिन व शुद्ध.

मत्सर, क्रोध या मलिन वासना होत, स्त्रियांच्या ठिकाणीं कामबुद्धि ही मलिन वासना होय. मातृबुद्धि ही शुद्ध वासना होय. ह्या परस्पर विरोधी आहेत. दुसरें उदाहरण:—डोळे झाकले म्हणजे कांही दिसत नाही. उघडले म्हणजे दिसतें. दोन्ही आपले स्वाधीन आहेत. त्याप्रमाणे शुद्ध वासना व मलिन वासना तुझ्याच ठिकाणीं राहतात. दोन्ही वासनांशीं आत्मा मिळून गेलेला असतो. जसें—आपलें शरीर आहे, किंवा जीभ आहे. शिव्या देतांना जीभ रंगून जाते व गोड बोलतांनाहि त्यांत रंगून जाते. शिव्या देण्याला किंवा गोड बोलण्याला जिभच पाहिजे. त्याप्रमाणे मलिन वासना किंवा शुद्ध वासना दोन्हीमध्ये आत्मा असतो. तो शुद्ध असतो. नोकर कचेरींत असतो तेव्हा कचेरीच्या कामांत व घरीं असतो तेव्हा घरच्या कामांत गुंग असतो, तसा आत्मा हा शुद्ध वासनेंतहि गुंग असतो व मलिन वासनेंतहि गुंग असतो. आत्मा शुद्ध व मलरहित आहे. तुझें शरीर चित्रांतहि काढतां येतें व आरशांतहि पाहतां येतें. परंतु आरशांत जशी कुंकवाची दुरुस्ती करतां येते, तशी चित्रांतल्या कुंकवाची करतां येत नाही. कारण चित्र मलिन असतें. आरसा निर्मळ असतो. चित्र एक-वेळ काढलें तसेंच राहतें, बदल करतां येत नाही. आरशांत बदल लवकर होतो. शुद्ध वासनेंत आत्म्याला दुःखाचा थोडाहि संस्पर्श समजतो. आप-ल्याला कितीहि दुःखाचा डाग समजतो. म्हणजे त्यापासून निराळे राहण्याची खटपट करतो. मलिन वासनेंत दुःख समजत नाही. भगवान वाल्मिकी म्हणतात:—मलिन वासना जन्म देणारी आहे. शुद्ध वासनेंतील दुरुस्ती करून घेतां येतें. राम शुद्ध वासनेने जसे मुक्त झाले तसा तूंहि शुद्ध वासनेने मुक्त हो.

हरि: ॐ तत्सत् श्री वासिष्ठतत्वे वासनाद्वैविध्य निरूपणं नाम द्वितीय रहस्यम् श्री ज्ञानेश्वरार्पणमस्तु ।

---

॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# ३०

## तृतीय रहस्य

आता मलिन वासनेचा त्याग करून शुद्ध वासना कशी वाढवावी, हें सांगण्याकरिता श्रीरामाच्या कथेचा उपक्रम करितात.:—लग्नाच्या वेळीं स्त्रियेची व पतीची ओळख नसते. लग्नांत निकटचा संबंध काढून आपण दूरचा जुळवून घेतो. मलिन वासनेचा संबंध सोडून शुद्ध वासनेस जुळवून घेण्याचे १० प्रकार आहेत. यांना संस्कार म्हणतात.

आगमोऽप: प्रजा देश: काल: कर्मच जन्मच ।
ध्यान मंत्रोऽथ संस्कारो दशैते गुणहेवत: ॥ श्रीमद्भागवत ॥

ज्याप्रमाणे बायका लहानपणापासून कुंकू लावीत असतात. कां तर त्यांना पति मिळण्याची आशा असते. विधवा कुंकू लावित नाहीत. कारण त्यांना पति मिळण्याची आशा नसते. मनुष्यजन्मांत आत्मा मिळण्याची आशा असते. हळूहळू शरीराची इच्छा दाबत गेले पाहिजे. हळूहळू मलिन वासनेचा त्याग करीत शुद्ध वासनेला वाढवावें लागतें. शुद्ध वासना शिकविण्याला शास्त्र उपयोगी पडतें. पाणी हें शुद्ध वासना वाढविण्याला उपयोगी पडतें. पाणी म्हणजे तीर्थ. प्रजा म्हणजे सत्संगती. सत्संगतीनें शुद्ध वासना वाढते. देश म्हणजे ठिकाण. हेंहि शुद्ध वासना वाढविण्याच्या उपयोगाचें आहे. शुद्ध देशांतला मनुष्य घाणेरड्या ठिकाणीं गेला असतां त्याला बरें वाटत नाही. मुलीला कुमारपणीं कोणीतरी पति पाहिजे असें कल्पून ती कुंकू लावित असते. कुमारपणीं पति दूर असतो. पण आपला आत्मा नेहमीच जवळ असतो. पाणी हें शुद्ध वासना वाढविणारें आहे. शास्त्र, पाणी, सत्संग, देश, काल, कर्म, जन्म, ध्यान, मंत्र व संस्कार ह्या

दहा गोष्टी शुद्ध वासना वाढविणाऱ्या आहेत. जन्म म्हणजे दीक्षा. ध्यान म्हणजे एखादी एकाग्र करणारी वस्तु. काल म्हणजे प्रातःकाल. प्रातःकाळीं सत्वगुण असतो. दुपारीं मन चंचल असतें म्हणजे रजोगुण असतो, व रात्रीं सुषुप्तींत तमोगुण असतो. सुषुप्तीचा तमोगुण रजोगुण दोन्ही सकाळच्या वेळीं नसतात. जन्म म्हणजे गुरुपासून घेतलेली दीक्षा. ध्यान हरीहराचें. मंत्र पंचाक्षरी. हे दहा संस्कार शुद्ध वासना वाढवितात. तुझें आडनांव देशपांडे. हें शब्दमात्रानें धारण केलें आहे. शरीर ज्या वासनेंत गुंग होतें, तो संबंध जबर मानावा लागतो. मी देह नसून परब्रह्म आहे, असा दृढ निश्चय झाला पाहिजे. वासना शुद्ध होण्याकरिता ह्या दहा गोष्टी क्रमानें झाल्या पाहिजेत. मनुष्यानें आपल्या आयुष्यांत ह्या १० गोष्टी पाळल्या पाहिजेत. यापैकी एकहि गुण कमी असल्यास तेवढी शुद्ध वासना कमी वाढते. सवयीचा परिणाम बुद्धिपेक्षा जास्त असतो. बुद्धीनें आपण करतो ही गोष्ट चांगली नाही हें समजूनहि सवयीमुळें तसेंच वर्तन करतो. म्हणून चांगल्या गोष्टी बुद्धीस न पटल्या तरी त्यांची सवय करून घ्यावी. आत्मा बुद्धीच्या आटोक्यांत नाही. उदा० गांजा ओढणें वगैरे. याप्रमाणे कोणतीहि गोष्ट बुद्धीला पटवून घेण्याची नेहमी सवय करावी. पहिले पहिले आपण आरसा घेऊन कुंकू पाहतो व नीट करतो. पण पुढे पुढे सवय झाली म्हणजे आरसा नको असतो. भंग्याला घाण सहन होते. सामान्य मनुष्य तेथें गेला तर वास बाधतो. मूर्ख मनुष्याला संसारांत भयंकर दुःख होऊनहि तें सहन करतात. चांगलीं माणसें मानसिक दुःख देखील सहन करीत नाहीत. शहाणी माणसें यत्किंचित् दुःखानेंहि पोळतात. हें सर्व योगाचें रहस्य आहे. श्रीराम अशाच प्रकारचे होते. ते विष्णु होते तरी आपल्या स्वरूपाला विसरल्यासारखे झाले होते. विष्णु एकदा ब्रह्मसभेंत गेले असतां सर्वांनी त्यांना नमस्कार केला, पण सनत्कुमारांनी नमस्कार केला नाही. तेव्हा विष्णुंनी त्यांना शाप दिला की, तुम्हाला आपल्या निःष्कामतेचा अभिमान आहे, तर एकवेळ तुम्ही सकाम व्हाल. सनत्कुमारांनी विष्णुला शाप दिला की, तुला सर्वज्ञतेचा अभिमान आहे, तर एकवेळ सर्वज्ञत्व विसरून तूं अल्पज्ञ होशील. जगांत

त्पज्ञ कोणीच नाही. मुंगीच्या दंशाने हत्ती मरतो. अग्नी
व पर्वतालाच फोडून टाकतो. मनुष्याला जितका मोठेपणा
ल्हानपणा आपोआप त्याच्यांत शिरत जातो. सर्वज्ञतेचा
तेचा (दोन्ही) अभिमान मिथ्याच आहे. वाघाला माणसें
त आहे. मोठेपणा किंवा लहानपणा विश्वांत कोणालाच नाही.
पलें काम करावयास लहान मनुष्याची मदत घ्यावी लागते.
या प्रकाशाने राजा काम करतो, तसेंच मुंगीलाहि दिव्याच्या
तें. दिवा राजाच्या किंवा ुंगीच्या विरोधी नाही. तो मोठे-
लहानपणाचा साक्षी होऊन राहतो. सनत्कुमारांनी विष्णुला
नाही, तर विष्णुला सर्वज्ञतेचा जो अभिमान होता त्याला
सें त्या कथेचें तात्पर्य आहे.

गास नाहीसें करणारें औषध जगांत नाही. भूक आणि अजीर्ण
नाहीसें करणारें औषध नाही. कुत्रें किंवा पक्षी आपल्या-
न नाहीत, पण त्यांना संग्रह करण्याची उपाधी नाही.
वयास मिळतें तें आपल्या काळजीने मिळतें असें नाही. कुत्रें
फिरतात तेव्हा त्यांना खावयास मिळतें. आपण नोकरी
कुत्र्याला तुकड्याकरिता मार खावा लागतो. आपणालाहि
लाता खाव्या लागतात. काम चुकलें तर दंड होतो. मालकाला
तर आपणाला तुकडा मिळतो. तात्पर्य:— कुत्र्यासारखेंच
वयास मिळतें. मानाने मिळतें म्हणणें लबाडी आहे. पुष्कळ
आपल्याहून श्रेष्ठ आहे. कुत्र्याला थोडी चोरी करावी लागतें.
खातात. आपणहि मध वगैरे माशांची विष्ठा खातो. कुत्रें जसें
अन्नांचा परिणाम विष्ठा खातात, तसें आपणहि गाई म्हशी
चा परिणाम दूध वगैरे खातो. मनुष्याच्या शहाणपणाचा
त्र व्यर्थ आहे. जगांत कितीहि वरिष्ठ झाला तरी तो कोणा-
ष्ठ नाही. इंद्र जसा आपल्या स्त्रियेला घेऊन आनंद मानतो
हि मानतो. जें सुखदुःख स्वर्गांत आहे तेंच नरकांतहि आहे.
स जितकें मोड लागतें तितकेंच कुत्र्याला लागतें. स्वर्ग व नरक

यांत जो भेद आहे तो हाच आहे. मनुष्याला ब्रह्मज्ञान होण्याची योग्यता आहे. ब्रह्मलोकांत गुरुच्या अपेक्षेवाचूनच बुद्धीने ज्ञान होतें. ज्ञानावाचून पशू व मनुष्य सारखेच. नीचपणा विष्णुचा व जारपणा पुरुषाचा सारखाच. विष्णुने वृंदेकरिता जालंदर दैत्याला मारलें, यांत विष्णु व जार दोघेहि सारखेच. विष्णु ब्रह्मज्ञानी असल्यामुळे त्याला लेप लागत नाही इतकेंच. विष्णुसारखा जार ब्रह्मज्ञानी असला तर त्यालाहि लेप लागत नाही. सनत्कुमार शाप कथेचें तात्पर्य इतकेंच आहे की, विष्णु-सारखें वैभव असलें तरी महात्म्यांचा अपमान करूं नये. खरोखर विष्णुला कांही त्यांनी शाप दिला नाही व विष्णु हे शापाने बद्ध होतहि नाहीत. तर सर्वज्ञपणाचा जो अभिमान विष्णुला होता, त्याला शाप दिला. लोकांना दाखविण्याकरिता तसें यांना करावें लागलें. श्रीराम शापाने अल्पज्ञाप्रमाणे भासलें. त्यांनी बालपण गेल्यावर तीर्थाची आज्ञा मागितली. आईबाप घरीं असतां तीर्थाला जाण्याची जरूरी नाही, हें त्यांना समजलें, पण मोक्ष मार्गाचें अवलंबन केल्यावर हेंच त्यांना इष्ट वाटलें. आईबाप तीर्थ खरें, पण तीर्थाचें फळच ते देऊं शकतील, मोक्ष देऊं शकत नाहीत. रामाने विचार केला की, स्वर्ग किंवा वैकुंठ हें तीर्थाचें फळ आईबापांच्या सेवेने मिळेल. पण त्यांची संसार करण्याची आज्ञाहि मला पाळावी लागेल व ती आज्ञा पाळली नाही तर आज्ञा मोडण्याचा दोषहि आपल्या पदरीं येईल. तीर्थाला गेले असतां तीर्थें आज्ञा मोडण्याचा प्रसंग आणणार नाहीत व सत्वशुद्धि मात्र अवश्य देतील म्हणून मोक्ष मार्गाचें अवलंबन करणाऱ्या मला तीर्थाला गेलें पाहिजे. असा विचार करून तीर्थाकरिता रामाने आज्ञा मागितली. पित्याने मोठ्या कष्टाने आज्ञा दिली. याप्रमाणे पित्याची आज्ञा घेऊन श्रीराम तीर्थाला जाण्यास तयार झाले.

हरिः ॐ तत्सत् श्रीवासिष्ठतत्वे निरभिमानतारहस्य निरूपणं नाम तृतीय रहस्यम् ।

श्री ज्ञानेश्वरार्पणमस्तु

---

आहेत. अज्ञान दोघापासूनहि निवृत्त होतें. पण मंद ज्ञानाचा नाश होण्याचा (म्हणजे तें विसरून जाण्याचा) संभव आहे. तसा दृढ बोधाचा नाश कधीहि होत नाही. भगवती म्हणाली, लीले ! तुला अजून मंद बोधहि झालेला नाही. कारण मला पूर्वजन्म दाखीव, जन्मांतर पाहण्याचें मला फार कौतुक वाटतें, असें तूं मला म्हणत आहेस. मंद ज्ञानी व दृढ ज्ञानी या दोघांनाहि जगत् मिथ्या आहे, असें सारखेंच वाटत असतें. जगांतील कोणत्याहि गोष्टीचें त्यांना कौतुक वाटत नाही. त्यांचा हर्ष शोक निवृत्त झालेला असतो. तुला तर तुझा पूर्वजन्म पाहण्याचें कौतुक वाटतें. त्याअर्थी तुझा हर्ष शोक गेला नाही. देवी म्हणाली, लीले ! तुला जर दुसरा जन्म पाहण्याची इच्छा आहे, तर तूं ह्या देहापासून आपलें चित्त काढ व दुसऱ्या जन्मांत जाण्याकरिता अभ्यास कर.

लीला म्हणाली, आई ! अभ्यास कोणता करूं ? तो कसा करावयाचा ? तो दृढ कशानें होईल ? आणि तो दृढ झाल्यानें काय होतें ? हें सर्व कृपा करून मला सांग.

पातंजल योगशास्त्रांत निरनिराळ्या सिद्धि मिळविण्याकरिता निरनिराळ्या प्रकारचे अभ्यास सांगितले आहेत. तशा प्रकारचे निरनिराळे अभ्यास करून निरनिराळ्या सिद्धि मिळविणें चांगलें नाही. कारण एका सिद्धीनें मनुष्याच्या वासनेची तृप्ति न झाल्यामुळे दुसरी सिद्धि मिळविण्याकरिता त्याला दुसरा अभ्यास करावा लागेल. दृष्टांतः—स्वतः स्वयंपाक करून जेवणारा एक पुरुष आहे. व दुसरा आपलें पोट भिक्षा मागून भरणारा आहे. त्या दोघांनाहि निरनिराळें पक्वान्न खाण्याची इच्छा झाली तर जो स्वयंपाक करणारा आहे, तो स्वतः एकाच गव्हाचें निरनिराळे पक्वान्न करून खाईल. भिक्षा मागणाऱ्याला एका एकाच्या घरून एक एक पक्वान्न मागून आणावे लागेल. त्याप्रमाणे ईश्वराची धारणा करिता करिता जर कांही वासना राहिली, तर त्यानेंच सर्व सिद्धि प्राप्त होतात. पण ईश्वरासंबंधी ज्याला कांही एक माहिती नाही, अशाकरिता निरनिराळ्या सिद्धीसाठी निरनिराळे उपाय पातंजल योगशास्त्रांत सांगितले आहेत. उदाहरणार्थ, हत्तीच्या बलाचें ध्यान केले असतां

हत्तीचें बळ येतें. परंतु श्रीमद्भागवत स्कंध ११ अध्याय १५ त असें सांगितलें आहे की, ज्या ज्या रीतीचें ध्यान करावयाचें असेल, त्या त्या प्रकारचे मलाच (परमेश्वरालाच) समजून ध्यान करावें, म्हणजे त्या त्या प्रकारची सिद्धि प्राप्त होते. उदा० परमात्माच हत्तीसारखा बलवान् आहे, अशी भावना धरून अभ्यास केला तर हत्तीसारखें बळ येतें. तात्पर्य असें की, परमेश्वराच्या धारणेनेच सर्व सिद्धि प्राप्त होतात. अशा आशयानेच भगवती म्हणाली, लीले ! तूं ब्रह्मज्ञानाचा अभ्यास कर. कारण तो अभ्यास पूरा झाला तर (तूं पक्की झालीस तर) तुला मुक्ति मिळेल; व तो अभ्यास पूरा झाला नाही तर (त्यांत तूं कच्ची राहिलीस तर) तुला सिद्धि प्राप्त होतील. "योग्याचा अभ्यास पुरा न होता तो मध्येच मरण पावला तर त्याचें काय होईल ?" असा प्रश्न अर्जुनाने विचारला असतां, भगवंताने गीतेंत असेंच सांगितलें आहे. भगवान् म्हणतात,

नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ।

जो चांगलें करणारा आहे, तो वाईट गतीला कधीच जात नाही. तो मध्येच मरण पावला तर स्वर्गांत किंवा ब्रह्मदेवाला, इंद्राला योग्य अशा पुण्यलोकांस जातो. त्याठिकाणीं तो वाटेल तसें भोग भोगतो, व पुनः पृथ्वीवर योगीयाच्या कुलांत जन्म घेतो; आणि कोणी शिकविणारा नसला तरी आपोआपच सर्व शास्त्रें त्याच्या बुद्धीत येऊन तो सर्व शास्त्र पारंगत होतो. भगवतीने असा विचार केला की, लीला जर ब्रह्मज्ञानाभ्यासांत कच्ची राहिली तर ती उत्तम गतीला जाऊन पुनः येथे येऊन तिला सिद्धि प्राप्त होतील; आणि तिचा अभ्यास पक्का झाला तर ती ज्ञानी होईल. म्हणून तिला एक ब्रह्माभ्यासच सांगणें बरें. निरनिराळें उपाय करावयास नकोत. जसें:– प्रत्येक रोग दूर करण्याकरिता निरनिराळें औषध घेतलें तर तें देतां येणार नाही, व दिलेच तर त्याच्यापासून नुकसान होते. याकरिता सगळ्या रोगांना धरून एकच औषध देणें चांगलें. त्यापासून नुकसान होत नाही. त्याप्रमाणे लीलेला एक ब्रह्माभ्यासच सांगावा, असा भगवतीने विचार केला; कारण त्यांत ती कच्ची राहिली तर तिला सिद्धि प्राप्त होतील व पक्की झाली तर मुक्त होईल.

लीला म्हणाली, आई ! अभ्यास कोणता करावयाचा तें सांग. भगवती म्हणाली, लीले ! मी तुला आता अभ्यासाचें लक्षण सांगतें, तें नीट ध्यानांत धर. ब्रह्माभ्यासाचें लक्षण योग ( प्राणायाम वगैरे ) कर्म किंवा उपासना यांच्यासारखे नाही.

लीला म्हणाली, ब्रह्माभ्यासाचें लक्षण कर्मासारखें कां नाही ? भगवती म्हणाली, आपल्याजवळ नसलेली वस्तु कर्माच्या योगानें मिळवावी लागते. आत्मा तर आपल्या अतिशय जवळ आहे. किंबहुना आपणच आत्मस्वरूप आहोंत. आत्मा कर्माच्या योगानें मिळवावा लागत नाही. म्हणून कर्म करणें हा त्याचा अभ्यास नव्हे.

उपासना म्हणजे स्वर्ग मिळविण्याकरिता सोळा सोमवारचें व्रत करणें, इत्यादि अनेक प्रकारच्या उपासना आहेत. ह्या उपासना करणेंहि ब्रह्माभ्यास नव्हे. कारण उपासनेमध्यें मी लहान व उपास्य देवता मोठी अशी बुद्धि ठेवावी लागते. अशी बुद्धि ठेवणें ज्ञानाच्या विरोधी आहे. दुसरें असें की, जी गोष्ट द्वैत बुद्धि वाढविते, ती करण्यांत कांही अर्थ नाही. आपल्याला अद्वैत सिद्धांत साधावयाचा असल्यामुळे द्वैत बुद्धि दृढ करण्यांत त्याचें फल नाही, म्हणून उपासना करणें हाहि ब्रह्माभ्यास नव्हे. प्राणायाम ( योग ) हाहि ब्रह्माभ्यास नाही. कारण पोहणारे प्राणायाम करतात. पण त्यांना ब्रह्मज्ञान नसतें. म्हणून प्राणायामादि अष्टांग योग करणें हाहि ब्रह्माभ्यास होत नाही. लीला म्हणाली, आई ! तर मग ब्रह्माभ्यास कोणता ? त्याचें लक्षण मला सांग. भगवती म्हणाली, सांगते. ऐक. अभ्यास म्हणजे संवय पाडणें. सवय म्हणजे इतर गोष्टींची आठवण न होऊन वारंवार तेंच तेंच ( एकच गोष्ट ) करणें. किंवा इतर गोष्टींची आठवण न येऊन तीच वस्तु डोळ्यापुढे सारखी दिसत राहणें, याला अभ्यास म्हणतात. अभ्यासाचें फलहि हेंच आहे. त्याकरिता प्राणायामच केला पाहिजे, असें नाही. कोणतीहि वासना धरून योग करतां येईल. परंतु देह, मन व बुद्धि या सर्वांचा त्याग करून ( देहावेगळे होऊन ) मी या सर्वांहून निराळा सच्चिदानंदस्वरूपी आत्मा आहे असें चिंतन करणें फार कठीण आहे. मी

देह, मन, बुद्धि या सर्वांहून निराळा आत्मस्वरूप असा असून, माझा व देह, मन, बुद्धि इत्यादिकांचा कांहीच संबंध नाही, अशा प्रकारचें नेहमी चिंतन करणें व दुसऱ्यासहि अशाचप्रमाणे नेहमी सांगणें, याला ब्रह्माभ्यास म्हणतात. आपण स्वतः एकांती आत्मचिंतन केलें, पण लोकांत जर दुसऱ्या प्रकारच्या व्यावहारिक गोष्टी सांगितल्या, तर दुसऱ्या प्रकारचेंच चिंतन होतें. याकरिता लोकांतहि त्याच गोष्टी सांगितल्या पाहिजेत, आणि परस्पर वादविवादही त्याचेच केले पाहिजेत. याप्रमाणे एकांती आत्मचिंतन करणें, लोकांती तेंच सांगणें व गुरुशिष्य नात्यानेहि परस्पर त्याच गोष्टी करणें, त्याच्यावांचून दुसऱ्या गोष्टी वर्ज्य करणें यालाच ब्रह्माभ्यास म्हणतात. आत्मा असाधारण आहे. तो कोणत्याहि साधनाने मिळविण्यासारखा नाही, कारण साधनाने मिळविलेली गोष्ट ( वस्तु ) नाश पावते. आत्म्याचा कधीहि नाश होत नाही. तो अमर आहे. वडिलांनी मिळवून ठेविलेलें शंभर वर्षाचें द्रव्य उधळ्या मुलगा थोड्याच कालांत संपवून टाकतो. याप्रमाणे मिळवून ठेविलेली वस्तू संपून जाते, ( तिचा नाश होतो ) हा सिद्धांत आहे. आत्मा साधनानी मिळेल तर तो नाश पावेल. आत्मा तर नित्य आहे. म्हणून तो मिळण्यासारखा नाही. त्याच्याकडे लक्ष्य लागल्यानेच तो मिळण्यासारखा आहे. म्हणून त्याचेच नेहमी एकांती चिंतन करावें, तेंच दुसऱ्यासहि सांगावें, व परस्पर वादविवादहि त्याचाच करावा. याप्रमाणे हा अभ्यासाचा एक प्रकार सांगितला आता पुढे अभ्यासाचे दुसरे प्रकार भगवति लीलेला सांगते, ते पुढे सांगेन.

हरिः ॐ तत्सत्
श्री ज्ञानेश्वरार्पणमस्तु

।। श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ ।।

# ४९

मंदबोध ज्याला झाला असेल, त्याच्या उपयोगी कर्मोपासना व
नाहीत, पण दृढ बोध ज्याला झाला असेल त्याने कर्मोपासना व योग
असतां कांही हरकत नाही आणि कर्मोपासना व योग हें आत्म
होण्याकरिता हेतुहि नाही, असें काल सांगितले. भगवति म्हा
लीले ! या आत्म्याला जाणण्याकरिता श्रवण, मनन व निदिध्य
याशिवाय दुसरा मार्गच नाही. श्रवण, मनन आणि निदिध्यासन
आत्मा जाणण्याकरिता हेतु आहेत. कारण भ्रमाने उत्पन्न झालेल्या
मध्ये क्रियासाध्य शांति होत नसते. (म्हणजे तिचा क्रियासाध्य
होत नसतो.) तो (भ्रमनाश) दुसऱ्याने सांगितल्याने किंवा अधि
ज्ञानानेच होतो. अधिष्ठान म्हणजे ज्याच्यावर भ्रम भासतो ते. हा
दोन तीन प्रकाराने होत असतो. जसा जसा विकार असतो तसा
भ्रम होतो. जसें–रज्जूवर सर्प दिसतो. तो भ्रम दोरी दिसल्याने
होतो. एका मनुष्याला काटा रुतला व सर्प चावला असें त्याला वा
पण लोकांनी सांगितलें की, सर्प चावला नाही. काटाच रुतला
तर त्याला तसें पुन: पुन: मनन करावें लागतें, म्हणजे तो भ्र
होतो. याप्रमाणे भ्रम जितका दृढ असेल तितकी श्रवण, मनन,
निदिध्यासन या तीहींची अपेक्षा लागते. आपल्या बुद्धींत तीन दोष अ
एक अज्ञान म्हणजे वस्तु न कळणें. २ रा संशय म्हणजे हें बरें आ
तें बरें आहे, असें वाटणें. ३ रा भलतेंच बरें वाटणें. यालाच अ
असंभावना व विपरीत भावना म्हणतात. मला आत्मा ठाऊक
मला आत्मा कळत नाही, अशा बुद्धीला आवरण म्हणतात. अ
म्हणजे झांकण. आत्मा सत्य आहे की, संसार सत्य आहे अशी जी
आहे तिला असंभावना किंवा संशय म्हणतात. संसारच सत्य

आत्मा सत्य नाही असें भलतेंच धरून बसूं नये; अशी जी बुद्धि ती विपरीत भावना म्हणावी. आत्मा आहे व तो देहादिकाहून निराळा आहे, अशा श्रवणाने आवरण दूर होतें. श्रवणकालीं आपण आत्मा हा शब्द ऐकतो, तो समजून घेण्याकरिता तरी आपणास देहादिकांहून आत्मा निराळा आहे, असें वाटतें. आत्मा शब्दानेच म्हणजे श्रवणानेच कळतो. असंभावना म्हणजे संशय. तिचा नाश होण्याकरिता मनन केलें पाहिजे. मनन म्हणजे जे वेद सांगतील तीच वस्तु तर्काने दृढ करणें व इतर वस्तु काढून टाकणें. संसारच सत्य आहे, आत्मा वगैरे कांही नाही, ही विपरीत भावना निदिध्यासनाशिवाय श्रवणाने किंवा मननाने दूर होऊं शकत नाही. गुरुजवळ जे नेहमी राहतात, त्यांना श्रवण, मनन आणि निदिध्यासन हे तीन्हीहि एकदमच घडतात. ( होतात. ) कारण त्यांना गुरुमुखाने श्रवण होतें, वारंवार चर्चा चालत असल्यामुळे मनन होत असतें आणि गुरूने घालून दिलेल्या नियमाप्रमाणे वागल्याने निदिध्यासन होत असतें. भारतांत असें सांगितलें आहे की, जे कुशल नाहीत त्यांनी गुरुवचनावर विश्वास ठेवावा. आपल्या मनुष्याला सवयीमुळे घरांत चांगल्या तऱ्हेने वापरतां येते. त्याप्रमाणे जे स्वतः कुशल नसतात, त्यांचा गुरूजवळ राहिल्याने सहजच अभ्यास होतो. गुरुकुलांचें ठिकाणीं ज्यांचा वास नसतो, त्यांना शास्त्रावरून श्रवण होतें. मनन आणि निदिध्यासन त्यांना आपल्या बुद्धीने करावे लागतात. मननाचे व निदिध्यासनाचे ठिकाणी देवताकृत विघ्नें पुष्कळ असतात. तें दूर करण्याकरिता स्वतःच अज्ञ जीव समर्थ नसतो. गुरुसन्निध राहिल्याने तीं विघ्नें बाधत नाहीत. आणि श्रवण, मनन, व निदिध्यासनाचे फार क्लेशहि होत नाहीत, तथापि कोण साधु आहे, कोण साधु नाही, अशा प्रकारचा सत्संगाचा ज्याला संशय असेल, अशाने आपल्या घरींच राहून शास्त्रांचा विचार करावा. गुरुजवळ किंवा साधुजवळ जाऊं नये. आता गुरुवाचून शास्त्रांचा सम्यक बोध होत नाही हें जरी खरें आहे, तरी ज्याला त्यांच्याबद्दल संशय आहे, त्यांनी त्यांच्याजवळ जाण्यांत कांही अर्थ नाही. त्यांतहि धर्मनिष्ठ कर्म करणारा जो असेल त्याने संताजवळ जाऊंच नये. कारण कर्मवादी म्हणतात

की, अमुक प्रकारांनीं वागणारा असेल तरच तो संत. असा त्यांचा ग्रह झालेला असतो. जसें—सकाळीं पंच पंच उषःकाळीं उठावें, मोरांचे पिसांनी डोळयांतील अश्रु धुऊन टाकावे. नाकांतलीं मेकडें चांगलीं काढावीं. शौचास मातीचे गोळे घ्यावे, स्नान संध्या करावी, वगैरे वगैरे प्रकारांनी वागणारा असेल तोच सत्पुरुष. असें त्यांनी सत्पुरुषाचें लक्षण ठरविलेलें असतें. परंतु वास्तविक तसा कांहीच नियम नाही. कारण प्रत्येकाचें प्रारब्धकर्म भिन्न भिन्न असतें. सर्व सत्पुरुषांचें ज्ञान एक असलें तरी त्यांचें प्रारब्ध एक राहात नाही. दृष्टांतः— ज्याला दोरीवर सर्प दिसतो, त्याला भिती उत्पन्न होते आणि ज्याला शिंपेवर रुपें दिसतें त्याला लोभ होतो. भिती व लोभ हे परस्पर विरुद्ध धर्म आहेत. भितींत वस्तू दूर जावी, असा तिचा द्वेष उत्पन्न होतो. लोभाने वस्तु जवळ यावी, अशी तिची प्रीति उत्पन्न होते. याप्रमाणें रागद्वेष हे परस्पर विरुद्ध धर्म आहेत, पण अधिष्ठानाचें ज्ञान झालें म्हणजे रुपें व लोभ दोन्हीहि निवृत्त होतात. त्याचप्रमाणें रज्जुरूपी अधिष्ठानाचें ज्ञान झालें म्हणजे सर्प व भिती ही दोन्ही निवृत्त होतात. पण भितीचे संस्कार, थरथर कांपणें, घाम येणें हे कांही वेळपर्यंत कायम राहतात. त्याचप्रमाणें हें रुपें आहे, तें मी घ्यावें अशी इच्छा असतें, पण तें रुपें खोटें ठरलें म्हणजे खिन्नपणा राहतो. याप्रमाणें नानाविध भ्रम आहेत. कर्मेंहि नाना आहेत आणि प्रारब्धहि नाना आहेत. पण आत्मे नाना नाहीत. आत्मा सर्वांचा एकच आहे. म्हणून साधूचें लक्षण एकच ठरलेलें नाही. प्रारब्धाने कांही साधु सदाचरणी असतात, व कांही दुराचरणीहि असतात. दुराचरणी साधु आढळला तर त्याच्याकडे जाऊं नये. उत्तम जिज्ञासू सत्पुरुषाच्या ब्रह्मज्ञानाकडेच पाहतो, त्याच्या आचरणाकडे पाहात नाही. ही गोष्ट मी आपल्या पदरची सांगतो असें नाही, तर वेदाचे काळापासून व इतिहासाचे काळापासून असेंच होत आलें आहे. वेदांत व इतिहासांत अशा पुष्कळ कथा आहेत. याज्ञवल्क्याने जनकाला ब्रह्मज्ञान सांगून त्याच्यापासून दोन मुली घेतल्या व पुढे संन्यास घेतला. वामदेवाला गर्भांतच ज्ञान झालें व वेश्येशी संयोग करीत राहिले. जनक ब्रह्मज्ञानी असूनहि राज्य करीत

होते. श्रीरामाला वनवास भोगावा लागला. परशुरामाला ढीवराचे ठिकाणीं व्यासाची उत्पत्ति करावी लागली. इंद्राच्या अंगावर अहल्येच्या शापामुळे सहस्र छिद्रें पडलीं. वसिष्ठाला कल्पपर्यंत पुत्र शोक करावा लागला. शंकराचें लिंग गळालें. ब्रह्मदेवाचें पांचवें शीर तुटलें. शंकराच्या शापाने व्यास गद्धे बनले. धर्माचा आंगठा गळाला. अर्जुनाला स्त्रीचें रूप घेऊन विराटाच्या घरीं राहावें लागलें. श्रीकृष्णाच्या सोळा हजार बायका कोळ्यांनी नेल्या. तुकारामाला खावयास मिळत नसे. एकनाथाच्या घरीं हजारो उत्सव होत असत. असें दुःखरूप प्रारब्ध पुष्कळांचें आहे. तात्पर्य, प्रत्येकाचें प्रारब्ध भिन्न भिन्न आहे

वेश्यारतो वामदेवो देवलो मांसभक्षकः ।
एतेषामेकधा ज्ञानं व्यवहारस्तु पृथक् पृथक् ।।

देवल मांस खात असत. रावण स्वभावतः गाई ब्राह्मणांना ताप देणारे होते. तथापि ते महात्मे होते.

कृष्णो भोगी शुकस्त्यागी नृपौ जनकराघवौ ।
वसिष्ठः कर्मकर्ताच त एते ज्ञानिनः समाः ।।

श्रीकृष्ण सोळा हजार स्त्रियां भोगीत होते. शुक्राचार्य त्यागी होते. ते मुहूर्तभर एके ठिकाणीं राहात नसत. जनक व श्रीराम हे राज्य करीत होते. वसिष्ठ उपाध्यायपणा करीत होते. नारदाला कळी लावण्याची संवय होती. ह्या सवयी प्रारब्धाने प्रेरित असल्यामुळे महात्मे दूर करीत नाहीत.

ओवी:—

शुका न मिळे लंगोटी । जनक बैसे राज्यपटी ।
वसिष्ठ पौरोहित्यासाठी । दर्भ तोडी ।।

तात्पर्य:— प्रत्येकाचें प्रारब्ध भिन्न भिन्न आहे. त्यामुळे ब्रह्मज्ञान दृढ असेल तर सत्पुरुषांचें अमुक एकच लक्षण असलें पाहिजे या म्हणण्यांत कांही अर्थ नाही. सर्वांना एकच स्वप्न दिसावें, असा नियम नाही. स्वप्नाचा पाहणारा आत्मा मात्र एक आहे.

म्हणून कित्येक कर्मवादी, अमुक एका विशिष्ठ प्रकाराने वागणारा असला तरच साधु, याप्रमाणे त्यांना आवडेल तसें तें साधूचें लक्षण करतात; व तसा वागणारा साधू नसला, तर त्याला सोडून देतात. अशा लोकांनी साधूकडे मुळीच जाऊं नये. आपल्या घरींच राहून शास्त्रीय विचार करावा. जो ब्रह्मज्ञानाकरिता वेडा झाला आहे त्याने मात्र महात्म्याजवळ अवश्य जावे. कारण त्याला ब्रह्मज्ञानावाचून दुसऱ्या कशाचीहि गरज नसते. भगवति म्हणाली, लीले ! श्रवण, मनन आणि निदिध्यासन यांचा अभ्यास करणारे तीन प्रकारचे लोक आहेत. शास्त्राने व तर्काने जगत् मिथ्या असून ब्रह्मच सत्य आहे, असा ज्याचा निश्चय होतो ते कनिष्ठ. ज्यांला जगन्मिथ्यात्व चांगलें समजलें आहे पण तें दृढ करण्याकरिता जो निदिध्यासनाचा अभ्यास करितात ते मध्यम आणि ब्रह्मज्ञान व जगन्मिथ्यात्व दृढ झालें असून ज्यांचे सर्व व्यवहार लीलेनें चालतात ते उत्तम. असा अभ्यास पूर्ण झाला असतांना जे ज्ञान होतें, त्यानें तिन्ही कालीं जगत् झालें नाही, असा अनुभव येतो. जसें—रज्जू-वर सर्प कधीच उत्पन्न झाला नाही, झाला असतां तर त्याचें प्रेत सांपडलें असतें. तसें दिसत नाही, म्हणून रज्जूला त्याचा संस्पर्शहि झाला नाही, व त्याचा रज्जूंत नाशहि झाला नाही, म्हणजे रज्जूंत सर्प मिळूनहि जात नाही. आता रज्जुवर सर्प भासतो. तो वास्तविक नसून भ्रमानें भासतो. त्याप्रमाणे विश्व केव्हाहि उत्पन्नच झालें नाही, असाच दृढ ज्ञानियाचा अनुभव असतो.

रज्जौ भुजंगो भयदो यथैव । न जायते नास्ति न चैति नाशम् ।।
त्वन्मायया केवलमात्तरूपम् । तथैव विश्वं त्वयि नीलकंठ
।। शिवगीता ।।

राम म्हणतात, हे नीलकंठ ! रज्जूवर सर्प उत्पन्न होत नाही, रज्जूवर सर्प नसतो व रज्जूंत त्याचा नाशहि होत नाही. परंतु रज्जुवर सर्प भ्रमाने भासतो व भिती उत्पन्न करतो. त्याप्रमाणे तुझ्या मायेनें हें विश्व भासतें. वास्तविक तें कधीच उत्पन्न झालें नाही. त्रिकालाबाधित एक ब्रह्मच सत्य आहे, अशी बुद्धि जेव्हा दृढ होते तेव्हा अभ्यास परिपक्व

झाला असें समजावें. अभ्यास परिपक्व झाला म्हणजे अमुक गोष्ट घ्यावी किंवा अमुक गोष्ट टाकावी अशी बुद्धि होत नाही. लहान मुली खेळ-वयाच्या भुलाईला मुलगी समजतात. त्या तिला स्नान घालतात, जेऊं घालतात. पण ही आवडती भुलाई आहे, असें त्यांना वाटत नाही. भुलाईचे ठिकाणीं लहान मुलीची सत्य बुद्धि असते. पण तीच मुलगी मोठी झाली म्हणजे तिची भुलाईचें ठिकाणीं अशी दृष्टि होत नाही. मी ही भुलाई खेळावयास घेतली आहे, असें तिला वाटते. त्याप्रमाणे अमुक गोष्ट वाईट किंवा अमुक गोष्ट चांगली आहे, अशी महात्म्यांची बुद्धि होत नसते. त्यांना कोणत्याहि गोष्टींचा रागद्वेष होत नाही. कारण चांगली किंवा वाईट बुद्धि होण्याकरिता जगत् सत्य आहे असें वाटलें पाहिजे. महात्म्याला जगत् मिथ्या आहे, असें भासतें. त्यामुळे जगांतील अमुक गोष्ट खरी आहे किंवा अमुक गोष्ट खोटी आहे, असें त्यांना वाटत नाही. सर्व जगत् मिथ्याच आहे, असें ते समजतात. म्हणून ते आलेल्या भोगाचा त्याग करीत नाहीत. कारण त्यांना द्वेष नसतो, आणि न मिळालेल्या भोगाची इच्छाहि करीत नाहीत. कारण त्यांना रागहि नसतो. याप्रमाणे ज्ञानी पुरुष प्राप्त भोगांचा त्याग करीत नाहीत. व अप्राप्त भोगाची इच्छाहि करीत नाहीत. ज्याला ज्ञान झालें आहे तो प्राप्त भोगांचा त्याग करितो असें कांही ज्ञानी म्हणतात. हें त्यांचें म्हणणें लोकांकरिता असलें तर हरकत नाही. पण वास्तविक तसें नाही. कारण ज्ञान झाल्यावर त्यांना कोणतेंहि कर्तव्य उरत नाही. त्यामुळे प्रारब्धाने जसें येईल तसें तो भोगतो व आचरण करतो. कोणी म्हणतील की, तो जर चांगलें वाईट आचरण करील तर लोक त्याची स्तुति किंवा निंदा करतील. पण तो निंदा किंवा स्तुति हेंहि प्रारब्ध समजूनच भोगतो. तात्पर्य:— सर्व व्यवहार प्रारब्धावरच अवलंबून असल्या-मुळे ज्ञानी पुरुष हर्षविषादाला प्राप्त होत नाही. तो शांत निरालंब स्थितींत असतो. या स्थितीलाच जीवन्मुक्ति असें म्हणतात. भगवती म्हणाली, लीले ! शिष्याला समाधि लागणें हें गुरूच्या अधिकारावर अव-लंबून नसतें. जसें—लवकर जेवणें किंवा हळूहळू जेवणें हें कांही स्वयंपाक

उत्तम करणाऱ्याच्या उत्तमपणावर अवलंबून नसतें, तर भूक लागण्यावर अवलंबून असतें. त्याप्रमाणे गुरूनें कितीहि ज्ञान सांगितलें, पण शिष्य जर जिज्ञासू नसला तर तें पटत नाही, व समाधीहि लागत नाही. पण शिष्य जर चांगला जिज्ञासू असला तर त्याला ज्ञान सांगण्याबरोबरच समाधी लागून जाते आणि आत्मचिंतन करीत असतांना इंद्रियादिकांचा विसर पडतो. लीला देवीला गुरु समजत असून ती उत्तम जिज्ञासू होती. पतीला पाहण्याची व जगत् कसें राहतें हें पाहण्याची तिची इच्छा होती. तसेंच परब्रह्म कसें आहे व जगत् मिथ्या कसें आहे हें जाणण्याची तिची जिज्ञासा होती. उत्तम जिज्ञासू असून जर त्यांच्यांत तर्क शिरला तर त्याला श्रुत्यनुसार ज्ञान सांगितलें तरीहि पटत नाही. उदाहरणार्थः— लहान लेकरूं आईच्या सांगण्यावरून भातकें—साखर—कडू आहे म्हणून थुंकून टाकतें. कारण आई कधीहि खोटें बोलणार नाही अशी त्याची बुद्धि असते. आपल्या बरोबरीचा महात्मा असला तर दृढ बुद्धि होत नाही. ही देवी आहे असा लीलेचा दृढ विश्वास होता. अज्ञानी लोकांचा विलक्षण (चमत्कारिक) गोष्टीवर विश्वास बसतो देवी जसें जसें सांगत असें तसें तसें लीलेचें अंतःकरण होत असें. हेंच या आख्यानाचें तत्व आहे. देवीच्या वरानें लीलेची बुद्धि निर्मल झाली होती, त्यामुळे देवी तिला जसें जसें सांगत असे तसें तसें तिचें अंतःकरणावर समाधी उत्पन्न होत असे. लीलेने देवी कल्पित केली होती. कल्पित पदार्थ तर्कानें जसाच्या तसाच दिसत नाही. श्रद्धेनेच तसा दिसतो. जसें—कोनाड्यांतल्या मूर्तीचें ठिकाणीं हा कागदाचा तुकडा आहे, असें तर्क दृष्टीने पाहूं लागलें तर कल्पनेंत मूर्ति राहणार नाही, पण भावनेनें दृढ श्रद्धा ठेविली तर तशीच कल्पनेंत मूर्ति राहील. याप्रमाणे कल्पित वस्तु तर्कानें दृढ होत नाही, श्रद्धेने दृढ होते.

उपासकानां कार्यार्थं ब्रह्मणो रूपकल्पना ।

अशी श्रुति आहे. उपासकांच्या कार्यासाठी ब्रह्माचें ठिकाणीं रूपाची कल्पना करावी लागते, अशी श्रुति सांगते. श्रुतीचा आशय असा आहे की, उपासनेंत तर्काची आवश्यकता नाही, कारण श्रद्धेनेच ती वस्तु तशी

भासते. एकतर लीलेने देवी कल्पित केली असल्यामुळे म्हणा किंवा तिच्या तपाने व व्रताने देवी तिच्यावर प्रसन्न झाली होती म्हणून म्हणा, लीलेचा विश्वासच देवीरूपाने परिणाम पावून आविर्भूत झाला होता. आपल्या इच्छेप्रमाणे व्रततपादिक केलें असतां देव प्रसन्न होतो. हें खरें आहे, तथापि आपल्या इच्छेने व्रतादिक करतांना शास्त्राप्रमाणे दृढ विश्वास होत नाही. कारण अज्ञानी लोकांना आपल्या स्वतःसंबंधानेच संशय असतो. दुसरें असें की, आपण एखादी वस्तु पाहिली नसली म्हणजे ती कल्पनेमध्ये आणतां येते, अशी आपली समज नाही. ती वस्तु अमुक प्रकारची आहे म्हणून शास्त्रावर विश्वास ठेवूनच मनुष्य तरूं शकतात. दुसऱ्या तऱ्हेनें तरत नाहीत. देवी लीलेच्याच आधीन असल्यामुळे स्वप्नांत आपण आकाशांतून उडतो व त्याप्रमाणेच देवीहि आकाशांतून उडते, असा तिचा दृढ विश्वास होता. भगवंताने अर्जुनाला जेव्हा विश्वरूप दाखविलें तेव्हा त्या ठिकाणीं पांडव कौरवादिक सर्व होते. परंतु विश्वरूप एकटचा अर्जुनालाच दिसलें, बाकीच्यांना दिसलें नाही. देवाने अर्जुनाला दिव्यदृष्टि म्हणजे आपली सत्वमय निर्मळ बुद्धि दिली होती. दिव्यदृष्टि म्हणजे आत्मदृष्टि नाही. त्यांत भगवान कौरवादिकांना खाऊन राहिला आहे. आणि पांडवांचें रक्षण करीत आहे असें अर्जुनाने पाहिलें. दिव्यदृष्टि मलिन आहे. त्याप्रमाणे देवी ही जीव नाही, परमेश्वरच आहे. तिच्या वचनावर पूर्ण विश्वास असल्यामुळे देवी जसें जसें सांगत असे तशी तशी तिला समाधी लागत होती. वसिष्ठ म्हणाले, रामा ! लीला समाधिस्त होऊन लाकडासारखा तिचा देह पडला आणि भगवती व लीला दोघीहि समाधिस्थित झाल्या.

॥ हरिः ॐ तत्सत् श्री ज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥

---

# केळकरांचा खाजगी पत्रव्यवहार

## खंड १ ला (१९५०)

प्रकाशकः– **य. न. केळकर**, पुणे, पृष्ठें ३४४ पत्रें ३१२ किंमत ६ रुपये

——००——

### पत्र नं. २०१ पृ. २०६–२०७

अंबाझरी, नागपूर. ता. २०–३–१९४४

श्री तात्यासाहेब केळकर यांच्या सेवेसी– सा. न. वि. वि.
कै. श्री गुलाबराव महाराज यांच्याबद्दल जें आपण विचारलें त्यांस प्रामुख्यानें त्यांनी अतींद्रिय शक्तीनें ज्ञान मिळविलें होतें काय हा मुद्दा दिसतो. आपण म्हटल्याप्रमाणें "श्री गुलाबराव महाराज यांनी कोणत्याहि भाषेतील कोणत्याहि विषयाच्या ग्रंथावर हात ठेविला असतां, त्यांतील ज्ञान त्यांच्या बुद्धींत व स्मरणशक्तींत संक्रमित होत असे" अशी त्यांच्या-बद्दल लोकांची विशेषतः त्यांच्या शिष्यवृंदांची समजूत होती हें निश्चित आहे.

मी त्यांच्या भक्तगणांत नव्हतों. मी ज्यावेळेस त्यांना पाहिलें त्यावेळीं मी १७–१८ वर्षें वयाचा असून कॉलेजमध्यें Inter किंवा B. A. मध्ये होतों. त्यांना मी १९०४–१९०५ मध्ये दोन चार ठिकाणीं पाहिले, भेटलों नाही. प्रत्यक्ष चर्चा करणें दूरच. मी जमलेल्या मंडळी-मध्ये बसत असे. त्यावेळेस ते निरनिराळ्या विषयावर एखाद्या तज्ञा-प्रमाणे बोलत असत, अशी सर्वांची समजूत होती. जमलेली मंडळी किती विद्वान होती हेंहि मला सांगतां येत नाही. फक्त श्री. मुळे हे त्यांचे पट्ट शिष्य समजले जात. यांच्या विद्वत्तेबद्दल मला त्यावेळेस आदर वाटत असे. एका ठिकाणीं ते पाश्चात्य तत्वज्ञानसंबंधाने चर्चा करीत होते. विषय प्रसिद्ध तत्वज्ञानी Kant असावा असें कांही स्मरतें. मंडळी

उठल्यानंतर त्यांच्या अंतेवासी मित्राकडून कळलें की, त्यांना कोणत्याहि ग्रंथाचें– मग ते कोणत्याहि विषयावर अगर भाषेंत असो– मर्म रात्रीं उशाखाली ठेवून दिलें तर सकाळीं त्यांच्या बुद्धींत संक्रमित होत असे. ही गोष्ट मात्र खरी की, त्यांचेसमोर पुस्तक ठेवलें तर ते त्याला चाचपत असत. दुसरें एके ठिकाणीं म्हणजे कै. ह. भ. प. हरदास यांच्या घरीं ग्वालेरचे एक नामांकित पखवाजी आले होते त्याचें वाद्यवादन झाल्यावर त्यांनी तबल्याच्या "बोला" संबंधाने बरीच चर्चा केली. त्यांत त्यांचें जें ज्ञान प्रकट झालें त्याबद्दल लोकांना फार कौतुक वाटलें.

मला स्वतःला त्यांचेबद्दल प्रत्यक्ष माहिती नाही. मुळची माझी वृत्ति जरा श्रद्धाळु आहे. अजूनहि मला Intuition (प्रतिभा ?) Intellect पेक्षा श्रेष्ठ आहे असें वाटतें. परंतु Intuition ने जरी प्रत्यक्ष कळलें तरी सत्यापर्यंत पोहोचावयाला लागणाऱ्या Logical पायऱ्या या बुद्धीशिवाय दिसत नाहीत असेंहि मला वाटतें. ज्यावेळेस गुलाबराव महाराजांना मी पाहिलें त्यावेळेस चिकित्सक बुद्धीचा अभाव असल्यामुळे त्यांच्याबद्दल सांगितलेल्या गोष्टी मलाहि खऱ्या वाटत असत. आता त्यांची व माझी गाठ पडली असती तर त्यांच्याबद्दल चर्चेनंतर माझा काय ग्रह झाला असतां हें सांगतां येत नाही. मी या बाबतींत witness होण्यास अगदी अपात्र आहे. कारण माझी माहिती ही hearsay आहे. ह्याला कांहीच शास्त्रीय मूल्य नाही.

(सही) भवानीशंकर नियोगी

(असली नक्कल True copy)

ज्ञानेश्वर उद्धव मांढरे.

ता. ९ जानेवारी १९५१.

श्रीयुत ज्ञानेश्वर उद्धव मांढरे.

रा. पुणे हल्ली मुक्काम नागपूर यांस,

स. न. वि. वि.

मी कै. तात्यासाहेब केळकर यांच्या पत्राला उत्तर ता. २०।७।४४ रोजीं पाठविलें होतें. त्यांत मी कै. श्री गुलाबराव महाराज यांना 'भेटलो नाही, प्रत्यक्ष चर्चा करणें दूरच' असें लिहिलें होतें. तें माझें पत्र कै. "केळकरांच्या खाजगी पत्रव्यवहार खंड १ ला." या पुस्तकांत पान २०६–२०७ यावर छापलें आहे.

परवा रविवारीं ता. ७–१–१९५१ रोजीं आपण डॉ. ल. वा. परांजपे व श्री रामभाऊ पेंडसे यांचे समवेत माझ्याकडे आला होता. तेव्हा आपण कै. श्री. गुलाबराव महाराज यांच्या चरित्रांत (पानें २८९ ते २९६) मी त्यांच्याशीं जी बराच वेळ चर्चा केली असा उल्लेख असून त्या चर्चेची हकीकतहि छापलेली दाखविली. ती चर्चा १६–७–१९११ रोजीं झाली असें त्यांतलें लिहिलें आहे.

मी ती चर्चा पहिल्यांदाच परवा वाचली. ती वाचून व डॉ. ल. वा. परांजपे व श्री दत्तात्रय गणपतराव खापरे यांनी ९–१–१९५१ म्हणजे आज आपल्याला लिहीलेलीं पत्रेंहि वाचलीं. तरीहि वर वर्णन केलेली १॥/२ तास झालेली (असें डॉ. परांजपे म्हणतात) चर्चा मला आठवत नाही, ही दुःखाची गोष्ट आहे. अशा महत्वाच्या घटनेचें विस्मरण व्हावें हेंहि मला आश्चर्यजनक वाटतें. या चर्चेसंबंधाचें मला स्मरण असतें तर कै. केळकरांना त्याबद्दल लिहिण्याला कांहीच प्रत्यवाय नव्हता. कै. श्री. गुलाबराव महाराज ह्यांच्या अलौकिकत्वाबद्दल जी त्यांची किर्ती होती तिचा उल्लेख मी कै. केळकर ह्यांना लिहिलेल्या पत्रांत केलाच

होता. त्याच्या पूर्वी सुद्धा मी १९३७ सालीं London मध्ये असतांना आमच्या प्रांतांतून सेवा निवृत्त झालेले Mr. Batchler यांनाहि कै. श्री. गुलाबराव महाराज ह्यांच्या अलौकिकत्वाच्या ख्यातीबद्दल सांगितले होते. तेव्हा ही चर्चेची (म. १९११ सालीं झाली असल्याची) गोष्ट मला माहित असूनहि व स्मरत असूनहि तात्यासाहेबापासून लपवून ठेवण्यास कांहीच कारण नव्हतें.

आपला

(सही) भवानीशंकर नियोगी

॥ श्री ॥

मंक्रांत २०–१–१९५१ धनतोली नागपूर.

फार जुनी गोष्ट. त्यावेळीं मी नुकतेंच कॉलेज जीवनांत पदार्पण केलें होतें. मी यावेळी जबलपूरला Inter Arts मध्ये शिकत होतो, व उन्हाळयाची सुटी असल्यामुळें जबलपूराहून नागपूर येथें आलो होतो. त्या दिवसांत माझे थोरले बंधु धंतोलीवर सरकारी शेती फार्मवर असलेल्या एका क्वारटर्समध्ये राहात होते, व तेथें मीहि माझें व डॉ. बाळाभाऊ उर्फ ल. बा. परांजपे यांचें नातें असून त्याचे आमचे संबंध फार जवळचे असत व विशेषत: मी तरी नागपूर येथें असतांना त्यांच्या-कडे पुष्कळ वेळां जात असे. शिवाय डॉक्टरांचे धाकटे बंधू श्री. अप्पा परांजपे जबलपूरला शिकत. त्यामुळें डॉ. बाळाभाऊ परांजपे यांचें घरीं माझें पुष्कळ जाणें येणें असे, व कित्येकदा तर मी त्यांच्या घरीं एक एक दोन दोन दिवस राहात असे. असा त्यांचा माझा संबंध असल्यामुळें एके दिवशीं संध्याकाळीं मी त्यांचेकडे सहज गेलो, व तसाच थेट त्यांच्या दवाखान्यांतील समोरच्या जिन्यानें वरील हॉलमध्यें गेलो. तेव्हां मला तेथें श्री. अण्णा (अनंतराव) परांजपे (डॉक्टरांचे वडील बंधू) कोणाशीं तरी बोलत असलेले दिसले. डॉक्टरांचा दवाखाना तेव्हां शुक्रवार नळयाच्या पाळीवर होता, व त्याला एक लहानसें पोर्चहि होतें. या पोर्च-वर लहानशी उघडी गच्ची होती. अनंतराव परांजपे या गच्चीच्या तोंडाशीं बोलत बसले होते. खरे म्हणजे अनंतराव बोलण्याऐवजी दुसरे गृहस्थच बोलत होते, असें म्हणणेंच जास्त संयुक्तिक होईल.

मी हळूच जाऊन, त्यांच्या शेजारीं असलेल्या एका खुर्चीवर बसलो. सदर गृहस्थ हे गुलाबराव महाराज होते हें मला मागाहून कळलें. महाराजांची काळीसावळी मूर्ति, गळयांत पोत, हातांत बांगडया, कपा-ळाला कुंकू, डोक्यांवर बायकासारखे केस, असा विचित्र वेष, शिवाय अंध हें सर्व पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें व मी अत्यंत कुतुहलानें त्याचें बोलणें ऐकूं लागलो. महाराज गंभीरपणें बोलत होते. विषय "मनाच्या श्लोका" बद्दल होता, व त्यांच्या म्हणण्याचा मतलब असा

होता की, मनाच्या श्लोकांत सर्व कांही धर्माचें सार आलेलें आहे, व सामान्य माणसाला समजेल अशाप्रकारें त्यांची मांडणी असल्यामुळे कोणत्याहि मामुली मनुष्यास त्याच्या नित्यपठणाने आपलें कल्याण करून घेतां येईल. त्याला मोठमोठे ग्रंथ किंवा वेद वेदांत वाचण्याची जरूरी नाही. सांगतां सांगतां ते असें म्हणाले कि मनाच्या श्लोकांत एक संगती; पहिल्या श्लोकानंतर येणाऱ्या दुसऱ्या श्लोकांशीं पहिल्याचा दुवा आहे पहिल्यांतून दुसरा व दुसऱ्यांतून तिसरा श्लोक कसा निघतो याची संगती एखाद्या दुसरे प्रसंगीं मी तुम्हाला फुरसतीनें सांगेन. याप्रमाणे भाषण चाललें असतां येथे महाराजांची १–२ मंडळी आली व बोलण्यांत खंड पडला. काळोख पडूं लागल्यामुळे मीहि जाण्याकरिता उठलो पण अनंतराव परांजपे मला म्हणाले, "रामा ! अरे आज तूं घरीं जाऊं नकोस: आमच्या येथेच रहा. आज कांही मंडळी महाराजास भेटण्यास येणार आहे व कांही वादविवाद चर्चा वगैरे होईल व तुला अनायासें हा प्रसंग पहावयास सापडेल." अनंतरावांना मी गुलाबराव महाराजांचें नांव, गाव व माहिती विचारली. महाराजांच्या बोलण्यावरून आपण त्याचा वादविवाद ऐकावा असें मला वाटलें व त्याप्रमाणे डॉ. परांजपे यांच्या घरींच मी जेवलो व वरच्या माडींत येऊन बसलो. रात्रीं ८–९ च्या दरम्यान मंडळी ठरल्याप्रमाणे जमली व हॉल मंडळींनी भरून गेला. श्री. प्रो. नाना पंडित (सायन्सचे), हिस्लॉप कॉलेजचे कांही बंगाली प्रोफेसर्स, मुळे मास्तर, शास्त्री बोवा वगैरे बरीच मंडळी तेथे हजर होती. त्यांत श्री. डॉ. सर भवानीशंकर नियोगी (माजी हायकोर्ट जज्ज नागपूर) हेहि होते. मी पटवर्धन हायस्कूलमध्ये असतांना श्री भवानीशंकर नियोगी हे माझे मास्तर होते व त्यांच्याबद्दल विद्यार्थी वर्गात व मास्तर वर्गांत मोठा आदर होता. शिवाय बर्डीवर रा. ब. वामनराव कोल्हट-करांच्या वाड्यांत मी राहत असतांना श्री. शंकररावांचा व माझा फारच निकटचा संबंध आला. त्यामुळे श्री. भवानीशंकरांच्या अभ्यासूवृत्तीचा गंभीर विचारसरणीचा व राष्ट्रीय वृत्तीचा माझ्या मनावर फार परिणाम झाला होता. श्री भवानीशंकर नियोगी सर्व मंडळींत बसले होते. जास्त वाचन, जास्त शिक्षण, तडफ, कळकळ व वादविवाद कुशलता इ.

गोष्टींमुळे बहुधा जमलेल्या मंडळीने त्यांनाचा आपल्यातर्फे बोलण्यास पुढे केलें. पुढे संभाषणास सुरवात झाली. महाराजांनी प्रथमच विचारलें की आपणांस वाद करावयाचा असेल तर मला त्याप्रमाणे बोलावें लागेल, नाही तर मी आपला नेहमीप्रमाणे बोलेन. तेव्हा श्री भवानीशंकर म्हणाले की, आम्ही वाद करावयास आलो नसून आपल्यासारख्यांच्या तोंडचे चार शब्द कानीं पडावें म्हणून आलो आहो. तेव्हा महाराज म्हणाले, ठीक आहे. तुम्हास काय विचारावयाचे आहे? तेव्हा श्री भवानीशंकर म्हणाले, "आम्हाला मोक्षाबद्दल कांही सांगा." तेव्हा महाराज म्हणाले, "पण मोक्ष म्हणजे तुमच्या म्हणण्याचा अर्थ काय?" तेव्हा शंकरराव जरा थबकल्यासारखे झाले व त्यांना महाराजाच्या बोलण्याचा अर्थ नीट समजेना. तेव्हा महाराज म्हणाले, "असे मोक्ष ३३ प्रकारचे आहेत. शैवांचा मोक्ष.... असा वैष्णवांच्या मोक्षाची कल्पना.... अशी ख्रिस्तांच्या मोक्षाची कल्पना... अशी," याप्रमाणे खाड खाड त्यांनी ३३ मोक्षाच्या कल्पना तेथे म्हणून दाखविल्या. मग तुम्हाला यापैकी कोणत्या मोक्षाची माहिती हवी? तेव्हा श्री. भवानीशंकर नियोगींनी शंकराचार्यांच्या मोक्षाबद्दल माहिती सांगण्याबद्दल सांगितले. महाराज माहिती सांगत असतांना श्री. शंकरराव मधून मधून प्रश्न करीत असत. तेव्हा महाराज म्हणाले, की तुम्ही पुनः वादाचे प्रश्न करतां! तेव्हा श्री. शंकरराव म्हणाले, जेथे समजत नाही तेथे प्रश्न विचारून खुलासा नको कां करून घ्यावयाला? यानंतर पुनः महाराजांच्या सांगण्याला सुरवात झाली. पण महाराजांचें प्रवचन होण्याऐवजी वादविवादात्मक संवादच जास्त झाला. महाराजांनी कांही सांगावें. त्यावर शंकरराव नियोगींनी कांही प्रश्न करावा याप्रमाणे चालले होते. महाराजांच्या बोलण्यांत कधी कधी चिडचिडेपणा होता. सदर मंडळी ही वाद करण्यासाठी आली होती असा त्यांचा ग्रह झाला होता. (कारण तसें अनंतरावाशीं बोलत असतांना म्हणाले होते.) सदर वादविवादांत किती तरी विषय येऊन गेले. Economics, Science व ९२ Elements मधील तेव्हा नुकतेच एका नामांकित शास्त्रज्ञाने शोधून काढलेले ५–६ द्रव्ये (हे कांही Gases होते) Kant च्या ग्रंन्थांतील इंग्रजी उतारा व त्यांत झालेली भाषांतराची चूक व त्यासाठी Kant चें जर्मन मूळ

म्हणून दाखवणें व चूक कोणत्या शद्बाच्या अर्थाची झाली तें सांगणें इ.इ. किती तरी गोष्टी त्यांच्या सांगण्यांत निघाल्या. एकदा तर महाराजांनी मागील १५–२५ मिनिटांचें सबंध संभाषण शब्दशः म्हणून दाखविलें. अलौकिक बुद्धिमत्ता, अचाट स्मरणशक्ति, सूक्ष्म युक्तिवाद, अंध असूनहि इतक्या तरुण वयांत कोणत्याहि गहन विषयांतील सांगोपांग माहिती झरझर अस्खलितपणे देणें, कोणत्याहि ग्रंथांतील वाक्येच्या वाक्यें म्हणून दाखविणें, पान ओळ, आवृत्तीसुद्धा सांगणें, संस्कृत इंग्रजी इत्यादि अनेक भाषा येणें, या सर्व गोष्टींचा माझ्या मनांवर इतका परिणाम झाला की तसा परिणाम पूर्वी किंवा नंतर क्वचितच झाला असेल. मी आपला एका कोपऱ्यांत बसून सर्व संवाद मोठ्या उत्सुकतेने व कुतूहलाने ऐकत होतो. वाद चांगला तास दोन तास झाला. १०-१०॥ च्या सुमाराम सभा संपली. व मी माझ्या घरीं धनतोलीवर निघून गेलो. त्या प्रसंगाचा ठसा माझ्या मनावर विशेष उमटला व मी कित्येक प्रसंगीं या वादाबद्दल पुष्कळ लोकांत सांगितलेंहि आहे. महाराजांच्या इतकी सखोल विद्वत्ता, स्मरण-शक्ति, अगाध ज्ञान, मार्मिक वादकौशल्य, अकुंठित करणारे युक्तिवाद मला फारसे पहावयाला मिळालेच नाही म्हटलें तरी चालेल. मी पुष्कळ मोठे लोक पाहिले, पुष्कळ हुशार माणसाशीं मला बोलण्याचा प्रसंग आला, पण श्री. गुलाबराव महाराजांची सर्वांगीण बुद्धीची अलौकिक चमक मला दिसली नाही. महाराजांना १–२ शंका ज्ञानेश्वरीबद्दल कोणत्यातरी अधिकारी पुरुषास विचारावयाच्या होत्या व त्यांना लो. टिळक व श्री. राजवाडे यांचीं नांवें सुचविली गेलीं असें मला स्मरते. असो.

फार जुनी आठवण असल्यामुळे त्यांत शब्द तसेच्या तसे येणें कठीण आहे. पण कल्पना मात्र बहुधा त्याच आहेत. सदर प्रसंगाबद्दल मी पुष्कळ वेळा सांगितलें असल्यामुळे त्यांतील कांही गोष्टी चांगल्या स्मरणांत राहिल्या असाव्यात. परंतु वाद बराच वरच्या दर्जाचा कित्येक वेळा गहन असा असल्यामुळे माझ्यासारख्या नवीन कॉलेजमधील विद्यार्थ्यांच्या आवाक्याच्या पुष्कळ वेळा बाहेरचा होता. महाराजांना पाहण्याचा माझ्या आयुष्यांतील हा पहिला व शेवटचा प्रसंग.

रा. के. पेंडसे

---

ता. ९-१-५१

श्रीयुत ज्ञानेश्वर उद्धव मांढरे, यांस

स. न. वि. वि.

आपण वै. श्रीसंत गुलाबराव महाराज यांच्याबद्दल साहित्यसम्राट न. चि. केळकरांच्या खासगी पत्रव्यवहार खंड १ ला पान नं. २०६ वर असलेलें सर डॉ. भवानीशंकर नियोगी माजी हायकोर्ट जज्ज नागपूर यांचें पत्र मला दाखविलें व तसेंच वै. श्रीसंत गुलाबराव महाराज यांचें चरित्रांतील पान नं. २८९ ते २९६ वरील मजकूर दाखविला. तो मी वाचला. त्याबद्दल मला काय माहिती आहे हें विचारल्यावरून मी खालील माहिती देत आहे.

वै. श्री गुलाबराव महाराज माझें घरीं दोन तीन वेळा आले होते. श्रीयुत श्रीधरबुवा परांजपेसंबंधी मजजवळ ह्यांचें वर्तन व गुरु हवा बद्दल बरीच चर्चा केली व आम्हांस मार्गदर्शन केलें. श्रीसंत गुलाबराव महाराजांचा जरी शिष्य नव्हतो तरी त्यांचेबद्दल मला नितांत आदर होता.

तसेंच एकदा आमच्या येथे श्री गुलाबराव महाराज आले असतां बरीच विद्वान मंडळी जमली होती. श्री भवानीशंकर नियोगी यांच्याशीं माझा बरेच वर्षांपासून स्नेह असल्यामुळे तेहि हजर होते. त्यावेळीं तत्वज्ञान व इतर शास्त्रीय विषयावर बरीच चर्चा झाली. जमलेल्या मंडळींत श्री. भवानीशंकर नियोगी हे कुशाग्र बुद्धीचे असल्यामुळे वादविवादांत साहजिकच त्यांना पुढे केले. व त्यांनी सुमारे १॥-२ तास तळघाचे पाळीवर आमच्या राहत्या घरीं श्रीसंत गुलाबराव महाराजाशीं विद्वत्तापूर्ण चर्चा केली.

मी सुमारे पाऊण तास चर्चा ऐकल्यावर दवाखान्यांत कांही जरूरीचें काम असल्यामुळे मला दवाखान्यांत जावें लागलें. ही चर्चा कोणत्या दिवशीं झाली हें सांगणें कठीण आहे. पण हे १९११ च्या चतुर्थीस वर्धा येथे गडावर श्रीधर बुवा परांजपे यांच्याशीं गडासंबंधी सांप्रदायाच्या नीतीमत्तेबद्दल जो वादविवाद झाला त्याबद्दल घडलें असें स्मरतें.

वै. श्रीसंत गुलाबराव महाराज यांवेबद्दल माझें मत विचारतां तें देणें फार कठीण आहे. संताच्याबद्दल मला लिहिण्याचा अधिकार आहे असें मला वाटत नाही. "संत होवोनिया । संतासी पहावे ।" हेंच खरे. कोणाला आत्मज्ञान झालें किंवा नाही हें दुसरा कोणी कसा सांगू शकतो? ज्याचें तेंच जाणू शकतो. पण एवढे निश्चित वाटते की, त्यांना अंधत्व असतांहि एवढें अगाध ज्ञान होतें की त्यांचें भाषण ऐकून त्यांचेवर कांही परमेश्वर किंवा सद्गुरु कृपा असून त्यांना ही अलौकिक सिद्धि प्राप्त झाली होती असें वाटे.

कळावे लोभ असावा ही विनंती.

आपला

ल. वा. परांजपे

श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ

श्रीयुत ज्ञा. उ. मांढरे राहणार पुणें हल्ली मु. नागपूर यांस सा. प्रणिपात वि. विषेश:-

श्री सद्‌गुरु गुलाबराव महाराजांच्या चरित्रांतील पृष्ठ २८६ ते २९६ पर्यंत जो मजकूर लिहिला आहे त्यावेळीं मी स्वत: हजर होतो. श्री महाराजाबरोबर वे. शा. श्रीनिवास शास्त्री, हरिदास, श्रीयुत वासुदेवराव मुळे माजी सुपरिन्टेन्डेंट नील सिटी हायस्कूल नागपूर, श्री का. ज. आठवले माजी अॅ. डि. जज्ज, श्रीयुत गोविंदराव सुभेदार इत्यादि सुप्रसिद्ध मंडळी होती. येथील सुप्रसिद्ध डॉक्टर लक्ष्मणराव परांजपे एम. एस. यांचे घरीं माडीवर डॉ. भवानीशंकर नियोगी माजी हायकोर्ट जज्ज नागपूर हे आपल्या मित्र मंडळीसह तेथे होते. त्यांचे मंडळींत डॉ. नियोगी हे त्यावेळीं (इ. स. १९११ मध्यें) मोठे कुशाग्र बुद्धीचे असल्यामुळे मंडळींनी त्यांना विनंती केल्यावरून त्यांनी श्री महाराजांशीं जी चर्चा सुमारे दीड दोन तास केली, त्यावेळीं मी स्वत: श्री महाराजाजवळ बसलो होतो. श्री महाराजांच्या संप्रदायांतील महाराजांचे प्रतिनिधि परमपूज्य श्री. बाबाजी महाराज उर्फ नारायणराव पंडित हेहि तेथे उपस्थित होते. श्री महाराजांच्या अलौकिक ज्ञानाने मी आकर्षित झाल्यामुळे त्यांच्याशीं होत असलेल्या अनेक चर्चेचे वेळीं मी प्रयत्नपूर्वक जात असून आदरपूर्वक त्यांचें टिपण घेऊन नंतर आपले मित्र मंडळीस सांगत असे. या प्रसंगीहि मी वरील चर्चेचें टिपण घेऊन घरीं गेल्यावर त्यांना समजावून सांगून तें त्यांना लिहून दिलें होतें. त्याला अनुसरूनच चरित्रांतील मजकूर लिहिला आहे. श्री महाराजांच्या स्वरूपाचे यथार्थ करण्यास मी असमर्थ आहे तथापि सुप्रसिद्ध बाबासाहेब गर्दे यांचेच खालील शब्दांत मी त्याचें थोडेसें दिग्दर्शन करतो.

विराग तव देखुनी मम मनीं तुका आठवे ।
स्वबोध दिधला तुला मज गमे अळंदीधवे ।।

तुझ्या बघुनी भक्तिला झुरति मत्सरे गोपिका ।
शिरीं धरिन मी अश्या पद भवाचिया पादुका ।।

वरील मजकूर मला आज जसा स्मरत आहे तसाच मी आपणाला सादर करीत आहे.

आपला

नागपूर
ता. ९-१-५१

दत्तात्रय गणपतराव खापरे
(एम. ए., एल एल, बी. अॅडव्होकेट)

---